# प्रीती मिळेल का हो?

मुरलीधर जावडेकर



मुरलीधर जावडेकर साहित्यकला प्रतिष्ठान

ca

लेखक
**डॉ. मुरलीधर जावडेकर**
महाराष्ट्र गृहनिर्माण मंडळ
उच्च उत्पन्न गट वसाहत, इमारत क्र.१, गाळा क्र.९,
संत तुकारामनगर, पिंपरी, पुणे ४११०१८.
दूरध्वनी : ०२०-२७४२१६८३ मोबाईल : ९८९०१६९१५६

ca

**प्रथमावृत्ती** : १९७४
**द्वितीयावृत्ती** : २०१२

ca

**मुखपृष्ठ**
लक्ष्मीकांत तोष्णीवाल
९४२२३०७४५३

ca

**अक्षरजुळणी**
व्यंकटेश टाईप
सुजाता तोष्णीवाल, पुणे
९४२०४८०५३६

ca

**मुद्रक**
लकी प्रेस, पुणे ३०

ca

**देणगी मूल्य ₹ ८०=००**

---

या नाटकास बृहन्मुंबईच्या पोलीस कमिशनरांचे
'प्रयोग करण्यास हरकत नाही' असे प्रशस्तिपत्रक मिळालेले आहे.

---

सूचना : या नाटकातील सर्व पात्रे आणि सर्व प्रसंग संपूर्णपणे काल्पनिक असून कोणास कोठे त्यात वास्तवाशी साम्य वाटल्यास तो निव्वळ योगायोग आहे, असे समजावे.

ई पुस्तक निर्मिती व वितरण :

## ई साहित्य प्रतिष्ठान

फ़ोन : 9869674820

esahity@gmail.com

पत्ता : जी ११०२, इटर्निटी

तीन हात नाका , ठाणे, ४००६०४

*www.esahity.com*

ई साहित्य प्रतिष्ठान ही नोंदणीकृत संस्था असून अनेक लेखक वाचकांनी एकत्र येऊन सुरू केली. संस्थेतर्फ़े दर आठवड्याला एक मराठी ई पुस्तक चाळीस देशांतील सुमारे दोन लाख वाचकांना विनामूल्य वितरित केले जाते. त्याशिवाय ई साहित्यच्या विविध वेबसाईट्सना लाखो  लोक व्हिजिट करतात.



*श्री. रमेश विटकर*

*प्रत्येक नव्या मराठी नाटकाचा शक्य तर पहिलाच प्रयोग पाहायचा आणि त्याची आठवण म्हणून त्याचे तिकिट जपून ठेवायचे, असा आगळा वेगळा छंद जवळजवळ पंचेचाळीसहून अधिकवर्षे जोपासत ठेवणारे हे नाट्यरसिक! मराठी माणूस नाट्यप्रेमी असतो, म्हणतात. त्याची मूर्तिमंत साक्षच! अशा व्यक्तीस हे नाट्य अर्पण करण्याची संधी मिळणे हे माझे मोठे भाग्यच!*

*– मुरलीधर जावडेकर*

# प्रीती मिळेल का हो?

या नाटकाचा पहिला प्रयोग **श्री. पां. रा. पै, वकील,** यांच्या अध्यक्षतेखाली मालवण (रत्नागिरी) येथे भंडारी एज्युकेशन सोसायटीच्या सभागृहात दि. २२ एप्रिल १९७३, रविवार रोजी रात्री १० वाजता **'नाट्यप्रीती'** संस्थेच्या सभासदांसाठी सादर करण्यात आला. त्यातील कलाकार :

| | | |
|---|---|---|
| **बीना** | : | **सौ. ललिता जावडेकर** |
| **सुरेश** | : | **श्री. दीपक परब** |
| **सुधन** | : | **प्रा. मुरलीधर जावडेकर** |
| **छोट्या भूमिका** | : | **श्री. प्रकाश कुशे** |

**संगीत :–**

| | | |
|---|---|---|
| **पार्श्वगायिका** | : | **सौ. संध्या पटवर्धन** |
| **हार्मोनियम** | : | **सौ. उषा काजरेकर** |
| **तबला** | : | **श्री. वसंतराव पाटकर** |

**सहायक :–**
**श्री. दीपक शेडगे**
**श्री. जयवंत नार्वेकर**

| | | |
|---|---|---|
| **दिग्दर्शकसहायक** | : | **श्री. प्रकाश कुशे** |
| **दिग्दर्शक** | : | **प्रा. मुरलीधर जावडेकर** |

# प्रीती मिळेल का हो?

**या नाटकात नवीन काय आहे?** 'मानापमान' मधील लक्ष्मीधर पैशापेक्षा दागिन्यांचा लोभी आहे. पण हे दागिनेही त्याला गर्भश्रीमंतपणामुळेच लाभलेले दिसतात. आणि दागिन्यांचा लोभ त्याला आहे तो दुसऱ्यांवर, मुख्यत्वे बायकांवर, छाप पाडण्यासाठी ('एक दागिन्याला एक बायको!') पैसे मिळविण्याचा तो कसलाही प्रयत्न मुळीच करत नाही. तो भेकड व मूर्ख तर आहेच; पण कमालीचा आळशी आहे ('लोळणचि भूमिवरी मोक्ष वाटे मला.') 'कवडीचुंबक' मधील पंपूशेट म्हणजे कंजूषपणाचा अर्क आहे. त्याला मुले आहेत. पण त्याला दुसरी बायको हवी आहे. हुंड्याची अट अर्थात आहेच. (हुंड्यावाचून लग्न करणं हे माझ्या तत्त्वाच्या विरुद्ध आहे.') तसेच त्याचे पैशावर प्रेम आहे. तो म्हणतो, 'तुमचे ते चकचकीत चेहेरे अन् छन् छन् खुळखुळ आवाज पुनः कधी मला पहायला न् ऐकायला मिळेल?' पैसे गेल्यावर त्याला वेड लागते. शेवटी तो पैसे मोजण्यात गर्क होतो. तो नाण्यांत रमतो. 'प्रीती मिळेल का हो?' मधील सुधनला नुसते दागिन्यांचे वेड नाही. त्याला सर्व प्रकारची फाजील श्रीमंती हवी आहे आणि ती सतत वाढायला हवी आहे. त्या दृष्टीने तो प्रयत्नशील आहे! सुधन खर्च करीत नाही कारण खर्च करण्यासाठी जो जीवनाचा अर्थ कळायला पाहिजे, जीवनात जो रस घ्यायला पाहिजे, तोच त्याला समजत नाही. पंपूशेट खर्च आवरतो. सुधनला तसे करावे लागतच नाही! सुधनला बायको हवी आहे, पण ती 'हुंड्यासह' असे नव्हे; हुंड्यासाठीच! जास्तीत जास्त हुंडा देणारी कोणतीही बाई त्याला चालेल! त्याला बायको हवी ती हुंडा, पगार, भाऊबीज देणारी! बायको हे सुधनच्या लेखी जास्तीत जास्त पैसा मिळविण्याचे एक जिवंत साधन आहे; ते जास्तीत जास्त फायद्याचे बनवले पाहिजे! त्याचे बायकोवर

प्रेम नाही तसेच पैशावरही नाही! त्याचे कशावरही प्रेम नाही. पण त्याला जास्तीत जास्त पैसा मात्र हवा आहे. ही एक विकृतीच म्हणावी लागेल. सुधनचा संदर्भ नव्या जगाचा आहे. तसेच सुधनला समजून घ्यायला नवे मानस-शरीरशास्त्र लक्षात घ्यावे लागेल. त्याचे फुगत्या रकमेचे वेड इतके आहे की त्यामुळे बायकोपासून मुले होण्यासाठी तरी बायकोत जितके लक्ष घातले पाहिजे तितके तो घालू शकत नाही आणि त्यामुळे त्याला मूल होण्याची शक्यता नाही! कारण वारसासाठी म्हणून तरी मुलावर जेवढे प्रेम हवे तेवढे तो करू शकत नाही. त्याला फक्त पैसा हवा – आणखी पैसा – आणखी पैसा! 'कशासाठी?' हा प्रश्न त्याच्या मनात उत्पन्न होत नाही. हा प्रश्न त्याला वेडेपणाचा वाटतो. 'लाखाचे दहा लाख, त्याचे शंभर लाख...' असे करीत राहणे हेच त्याच्या मते जीवनचक्र! सुधनच्या निमित्ताने नव्या मानवात दिसणाऱ्या एका प्रवृत्तीचे चित्रण झाले आहे, असे मला वाटते. पैसे बुडाले तर सुधन वेडा होत नाही, तो मृतप्राय बनतो! पंपूशेट कायदा मोडतो का? सुधनला पैसा मिळवणे हाच कायदा आहे!

सुधनला विकृत तरी का म्हणावे? त्याचे स्वरूपच तसे आहे! त्याला त्याचा इलाज नाही! त्यात बदल होण्याची शक्यता नाही! दुसऱ्या कोणत्याही प्रकारच्या जीवनाची त्याला कल्पना नाही! त्याचे जीवन तो जगत असल्याने एक स्त्री आली आणि गेली तरी त्याला त्याचे त्याच्या जीवनक्रमाच्या अर्थापलीकडे कमीअधिक सुखदुःख काही नाही! बीनाचा स्तर वेगळा आहे. तिच्या अनुभवाचे स्वरूप संमिश्र आहे आणि त्या अनुभवाचे निश्चित स्वरूप तिला उमजू शकत नाही. मात्र स्वामीच्या स्वरूपात सुरेशला पाहून तिच्या अंतर्मनाला चटका लागतो; पण तिला लग्न योग्य वाटते, तो संस्कार दृढ वाटतो! सुरेशचे व्यक्तिमत्त्व सर्वांत वरचे वाटते. पण ते प्रवाही म्हटले पाहिजे. हा प्रवाह विद्युत्प्रवाह म्हणावा जो वरखाली होऊ शकतो, वेगवेगळ्या रूपांत प्रगट होऊ शकतो. सुरेशच्या सर्व कृती लक्षणीय वाटतात. स्थूल मानाने म्हणता येईल की पहिल्या अंकात तो बीनाला जागी करण्याचा प्रयत्न करतो; दुसऱ्या अंकात दोघांनाही जागे करण्याचा प्रयत्न करतो; तिसऱ्या अंकात प्रथम बीनाला नंतर सुधनला जास्तीत जास्त जोरदार धक्के देण्याचा प्रयत्न करतो. या सर्व वेळी त्याच्या बीनाविषयक भावनेचा विकासच होत जातो. त्याची भावना मानवीच आहे पण ती अशारीर पातळीवर (प्लेटॉनिक लव्ह) जाऊ शकते. थोडक्यात अशी रूपरेषा सांगता येईल.

अशा प्रकारे हे एक नवनाट्य ठरावे! अभिनय करतानाही नटांनी याची जाण ठेवावी. सुधनचा अभिनय विदूषकी नसावा. बीनाला अंतर्मन बहिर्मनाच्या छटा दाखवता याव्यात. सुरेशने कोणतेही रूप घेतले तरी तो सुरेशचे भान विसरू

शकत नाहीच. त्यामुळे सुरेश म्हणून व स्वीकारलेले रूप म्हणून त्याची दुहेरी प्रतिक्रिया हवी. शिवाय त्यालाही स्वतःचा अनुभव काहीसा गूढ व अगम्य आहेच. भवितव्य सर्वथा गूढच. तसा त्याचा अभिनय हवा. एवढे म्हणता येईल की, सुरेश हा मोठा चतुर, मिस्किल, विनोदी, प्रेमळ म्हणून लाडका प्रियकर ठरावा! बीना कौतुकास्पद ठरावी! आणि सुधन विनोदाला कारण ठरावा – त्याच्या नकळत!

**हे नाटक अश्लील आहे काय?** – यात दोन मुद्दे येतात. एका नवऱ्याने आपल्या बायकोला नटी होण्यासाठी चित्रपटनिर्मात्याची गाठ घालून द्यावी, हे दाखवावे काय? धर्मराजाने द्रौपदीला जुगारात पणास लावले नव्हते काय? जुगारात पणास लावणे याचा अर्थ काय होतो हे नंतर उघड झालेच! अर्थात महाभारताची कथा गंभीर आहे तर 'प्रीती मिळेल का हो?' विनोदात्मक आहे. दुसरे असे की, नवऱ्यांनी नवरेशाही गाजवून बायकांना केवळ पैशांसाठी चित्रपटांत काम करण्याची सक्ती केली अशा अनेक सत्य कथा आता प्रसिद्ध आहेत! चित्रपटांत कलेऐवजी पैशासाठी शिरल्यावर किंवा शिरणे भाग पडल्यावर काय होत असेल हे सांगण्याची आवश्यकता नाही. याच नाटकाचा विचार केला तर या नाटकाला मुंबई पोलीस कमिशनरांचे 'हरकत नाही' प्रशस्तिपत्रक आहे त्या अर्थी यात कायदेशीरदृष्ट्या काही अश्लील नाही. पण एवढेच नव्हे. सुधनला श्लीलअश्लीतेची जाणीव नाही. सुरेशचा हेतू अश्लील नाही. बीना अश्लील काही करणारच नाही. यामुळे हा प्रसंग अश्लील न होता विनोदीच होतो! या दृष्टीनेच हा प्रसंग सादर करावयाचा. असले प्रसंग चित्रपटनाटकांत घालण्याची जणू चाल पडली; तिचे बिडंबन व्हावे. दुसरा मुद्दा : बीनाने नवऱ्यास सोडावे काय? त्यावर प्रश्न : नवऱ्याने पुनश्च तसला प्रसंग आणला तर तिने काय करावे? नवऱ्याचा काही पतिधर्म आहे की नाही? असल्या प्रसंगानंतरही बीना त्याला सोडत नाहीच. सुधनचे अस्सल स्वरूप स्पष्ट होते तेव्हाच ती त्याला सोडते. खरे म्हणजे, त्याने तिला केव्हाच सोडली आहे! किंवा, सुधनने तिला (मनात) धरली होती केव्हा? राज्याला वारस हवा आणि राजा तर या बाबतीत अक्षम म्हणून राणीने एका परतरुणाशी संबंध ठेवावा असा निर्णय भर दरबारात चर्चा करून मंत्री घेतात, तशी कृती होते, आणि साहजिकच राणीच्या मनात त्या तरुणाविषयी भावबंध उत्पन्न होतो, अशी नाटके सोज्वळ नाटककार लिहीत असून तितकेच सोज्वळ नट करीत आहेत! इतर नाटकांचा उल्लेख मी करीत नाही. पैशासाठी बायकांना राबविणारे, हुंड्यासाठी पहिल्या बायका मारून दुसऱ्या करणारे पुरुष आपल्या भारतात कमी आहेत काय? अशा बायकांनी

काय करावे? मरावे? अश्लीलतासूचक अभिनय किंवा शब्दोच्चार याच काय कोणत्याही नाटकात नसावा, हे सांगण्याची आवश्यकता नाही. हे नाटक अगदी 'हस्तस्पर्शविरहित' आहे! कोणीही, कोठेही करावे. अगदी खुशाल!

हे सर्व विवेचन शक्य तो थोडक्यात केले आहे. सविस्तर लिहायचे तर खूप जागा लागेल. पण एक तर सुजाण रसिकांना सगळे सांगण्याची आवश्यकता नाही; आणि दुसरे असे की हे 'सगळे' मला तरी कुठे ठाऊक आहे? मला एवढेच ठाऊक आहे की ही एक उत्स्फूर्त सुंदर कलाकृती आहे, तिच्याच खूप आकर्षकता आहे, म्हणूनच रसिकांच्या सेवेसी ती मी सादर करीत आहे! जाता जाता एक गौण मुद्दा मांडू का? बायकोला नोकरी करणे आणखी अर्थार्जन करणे भाग पाडणारे अनेक लोक असतात. स्त्री-शिक्षणाची परिणती यात झाली आहे! तसेच रोजचा हिशेब लिहून मगच झोपणारे लोक मी पाहिले आहेत. पण प्रत्यक्षातल्या कोणत्याही माणसाचे हे चित्रण वा विडंबन नाही. नाटकातली पात्रे ही नाटककाराची निर्मिती असते. मुद्दा असा की, याची ही लकब, त्याची ती ढब असे जोडून घेऊन ही पात्रे बनवलेली नाहीत. ही पात्रे एकसंध आहेत.

**हे नाटक कसे करावे?** एक स्त्री आणि दोन पुरुष कलावंत व एक सहायक अशा साडेतीन शहाण्यांचे हे नाटक! या सहायकाने पडद्यामागील काम सांभाळावे व हमाल आणि शेवटी स्त्री-वेषधारी म्हणून यावे. स्त्री कलावंत तयार असेल आणि जमणार असेल तर तिनेच शेवटी पुरुषवेष दाढीमिशा लावून वरून पातळ नेसून तोंडावरून पदर खाली ओढून घेऊन यावे. नेपथ्य फक्त सूचक ठेवावे. मागे एक रंगीत पडदा पुरे. दारांसाठी दोन पार्टिशन्स घेऊन त्यांना पडदे लावावेत. ही दारे बदलली म्हणजे त्यांची जागा बदलली व त्यांचे पडदे बदलले की घर बदलते! पहिल्या अंकात नटराज व व्हीनस हे पुतळे, दुसऱ्या अंकात लेण्यातील जोडप्याचे दृश्य रंगविलेले भित्तिचित्र. तिसऱ्या अंकात एक तिजोरी (एखादे लाकडी खोके दर्शनी तिजोरीसारखे रंगवावे) एवढे सामान खूप झाले. बाकी निरनिराळे पोशाख व किरकोळ वस्तू सहज उपलब्ध होऊ शकतात. दुसऱ्या अंकात रंगभूमीच्या डाव्या दोन-तृतीयांश भागात सुधन-सुवर्णाची खोली व उजव्या उरलेल्या भागात दोन खोल्यांच्या मधली जागा दाखवावी. अशा प्रकारे अगदी स्वस्तात व सोप्या रीतीने हे नाटक करता येते. तीनच पात्रे असल्याने अभिनय मात्र प्रत्येकाचा कसदार हवा! म्हणून तर या नाटकात नाट्य आणि अभिनय याच गोष्टी महत्त्वाच्या आहेत. कलावंतांची या दोन्ही गोष्टींची जाण मात्र परिपक्व असावी. संगीताने नाटकाला काव्यमयता येते. या नाटकातील पदांच्या चाली मंत्रमुग्ध करणाऱ्या आहेत. हे नाटक एखाद्या मध्यम हॉलमध्ये व

मोजक्या परंतु सुजाण प्रेक्षकांसमोरही फार रंगू शकते! या नाटकाने अशा प्रकारे कलावंतांची आणि प्रेक्षकांचीही खऱ्याखुऱ्या नाट्याची भूक उत्तम प्रकारे भागू शकते!

**संघर्ष** : सुरेश की सुधन हा बीनाच्या बाबतीतील प्रश्न म्हणजे स्थूलमानाने या नाटकातील संघर्ष आहे असे वाटेल, पण पात्रांच्या मनांतील – जाणिवेतील आणि नेणिवेतील – संघर्ष येथे अधिक महत्त्वाचे ठरावेत.

**भाषा** : स्फटिक चमकतो आणि त्याचा कोन किंचित बदलला तरी एकदम वेगळीच चमक दिसते. अशी या नाटकाची भाषा आहे.

# प्रीती मिळेल का हो?

# १

**(बीनाचे घर)**

बीना : **येइ प्रिया येइ प्रिया वाट किती पाहू**
**साथिविना रसिक तुझ्या गीत कसे गाऊ**
**येशील तू वाटे मज मजमागुनि हळु लपुनी**
**झाकिशील डोळे मग अपुल्या मृदु हातांनी**
**मिटतिल मग नेत्रदले न् फुटतिल पाठीला डोळे**
**रूप तुझे बिंबवुनी फुलवितील देहकळे**
**एकरूप होऊनि मग हरूप नवा लेवू**
**मिळवुनि कर जुळवुनि स्वर गीत नवे ऽ गाऊ**

किती वाट पाहायची तरी आम्ही? माळलेली फुलं सुकून जायची वेळ आली. सगळं घर कसं आरशासारखं स्वच्छ लख्ख करून ठेवलं होतं. पण मेली ही धूळ सगळीकडे साचत चालली. आणि एवढी तासन् तास खपून चेहऱ्याची ही रंगरंगोटी केली तीसुद्धा पुसट होत चालली. (आरशात) पाहा पाहा काय ध्यान दिसतंय ते. (मेकअप करीत) खरं म्हणजे, मला या रंगांची काय जरूरी? माझा मूळचाच रंग कसा दंग करून टाकणारा आहे. आणि माझं अंतरंगही कलेच्या नवरंगांनी नटलेलं आहे. पण हे म्हणतात ना, ''माल असतो कसा यापेक्षा दिसतो कसा यालाच जगाच्या बाजारात किंमत आहे.'' मी माल? आणि तुम्ही, हमाल? तर म्हणतात, ''अग जगात आपण उठून दिसलं पाहिजे; तरच जगाचा लाभ उठवता येईल.'' हे मात्र खरं. ते खूप खूप पैसा मिळवणार आहेत आणि मी खूप खूप कलाविलास करणार आहे. पण अजून आले कसे नाहीत? गेले असतील आणखी पैसे मिळवायला! आत्ता नव्या, लग्नाच्या, खास माझ्या साड्या आणायला जायचं होतं. काही माझ्या पसंतीच्या. काही ह्यांच्या. घरी, ह्यांच्या पसंतीच्या. बाहेर, माझ्या पसंतीच्या. पण यांना पैशापुढे माझी आठवण होईल तर ना! नुसताच काय पैसा, पैसा आणि पैसा? साड्या

नकोत? (चाहूल घेऊन) अय्या! आले वाटतं? इश्श्, माझं बोलणं ऐकलं तर नसेल? जाऊ दे. आता अश्शी बाजूला बसते आणि लक्ष नसल्याचं नाटक करते. म्हणजे ते हळूच मागून येतील आणि...

(एक तरुण झब्बा पायजमा अशा वेषात येतो. हातात भेट देण्याचा लांबलचक पुष्पगुच्छ – पुष्पदांडा – आहे. तो दारात येतो. खाकरतो, चुटक्या वाजवतो, लक्ष वेधण्याचा प्रयत्न करतो. पण हिचे लक्ष नाही ना? शेवटी तो तसाच पुढे येतो आणि पुष्पदांड्याने तिला डिवचतो. ती मागे वळते...)

**बीना** : सुऱ्या, तू?

**सुरेश** : 'सुऱ्या' नाही...

**बीना** : मग काय 'सूर्या?'

**सुरेश** : नाही, तुझाच प्रिय सुरेश – सुरांचा म्हणजे तुझ्या स्वरांचा ईश – सुरेशचंद्र!

**बीना** : तू का आलास इथं?

**सुरेश** : अर्थात, तुझं अभिनंदन करायला! तुझं लग्न ठरलं ना? मग तुझं अभिनंदन करण्याचा पहिला हक्क माझा नाही का? अग मी तुझा पहिला प्रियकर नव्हे का?

**बीना** : अभिनंदन की अपमान?

**सुरेश** : अपमान? छे छे छे! मनातून अगदी काढून टाक! अभिनंदन! अभिनंदन! अगं, आपलं कोकरू वाट चुकून दुसऱ्याच्या शिवारात शिरलं म्हणून त्याला नावं ठेवून काय उपयोग! त्याला प्रेमानंच हाका मारीत राहिलं पाहिजे! नाही का बीना, बीना, बीनाऽ

**बीना** : सुरेश

**सुरेश** : बीना

**बीना** : सुरेश

**सुरेश** : बीना

**बीना** : सुरेश, सुरेश, सुरेश! स्त्री म्हणजे तुला आपल्या मालकीची वस्तू वाटते? जळ्ळी मेली पुरुषांची जात ही!

**सुरेश** : तू लग्न कुणाशी करणार आहेस?

**बीना** : तुझ्याशी खास नव्हे.

**सुरेश** : खास लग्न त्याच्याशी? आणि माझ्याबरोबर झाला तो काय नुसता भास?

**बीना** : असं काय केलं होतं रे मी तुझ्याशी? पुनः पुनः बोलतोस? मी काही

तुला लग्नाचं वचन दिलं नव्हतं.

**सुरेश** : लग्नाचं नव्हे कबूल. पण प्रीतीचं...

**बीना** : वचन दिलं होतं?

**सुरेश** : आता प्रीतीची काही वचनचिठ्ठी नसते, जशी लग्नाची असते. पण...

**बीना** : नुसतं प्रेमकाव्याचं वाचन केलं कॉलेजमध्ये शिकताना तर त्या बाशिंगबळावर तू लग्नाची बोलणी काढू लागलास?

**सुरेश** : चुकतेस तू. लग्नाची मुळीच नव्हे.

**बीना** : पण प्रेमाची?

**सुरेश** : हो हो, प्रेमाची.

**बीना** : म्हणजेच लग्नाची.

**सुरेश** : अग पण तुझं तर प्रेम इथे अन् लग्न तिथे चाललंय की!

**बीना** : तुला काय वाटतं, मी लग्न त्यांच्याशी करते आणि प्रेम तुझ्यावर करते! काय समजलास मला तू?

**सुरेश** : माझी देवता!

**बीना** : म्हणून ही पूजा करतो आहेस वाटतं?

**सुरेश** : अग देवदेवतांनासुद्धा घंटा वाजवून वाजवून जागं करावं लागतं. कारण देव मंडळी बहुधा राक्षसांनाच प्रसन्न होतात!

**बीना** : अन् तू मला जागं करणार?

**सुरेश** : ते काय माझ्या हातांत आहे? मी फक्त घंटा बडवणार! ठण्-ठण्-ठण!

**बीना** : तुझी ही गजघंटा बंद करशील का? आणि येथून निघून जाशील का? एवढी कृपा कर माझ्यावर. नाही, तू माझा भक्त आहेस म्हणून सांगते. वत्सा, आपल्या घरी जा. सुखानं झोप. वाटल्यास देवतेच्या प्रार्थनेच्या कविता कर आणि बैस टाळ कुटीत. जा बाबा, जा हं आता!

**सुरेश** : अग देवता असं बोलत नाहीत. त्या काहीच बोलत नाहीत. त्या फक्त स्फूर्ती देतात! आणि म्हणून भक्तांनाच त्यांची काळजी घ्यावी लागते. त्यांना भूपाळी म्हणून उठवावं लागतं, त्यांना आंघोळ घालावी लागते...

**बीना** : सुरेश

**सुरेश** : त्यांना चांगली वस्त्र नेसवावी लागतात.

**बीना** : सुरेश

**सुरेश** : आणि त्यांच्यावर सारखी नजर ठेवावी लागते. त्यांची चोरी होऊ नये म्हणून! अग हल्ली चांगल्या मूर्तींना फार मागणी आहे परदेशांतूनसुद्धा!

**बीना** : म्हणजे? तू माझ्यावर नजर ठेवणार? माझं लग्न ठरल्यावरसुद्धा?

**सुरेश** : अग लग्न झाल्यावरसुद्धा!

**बीना** : बाई बाई बाई! काही वाटतंय का तुला?

**सुरेश** : अग खूप खूप वाटतंय, सगळं सगळं आठवतंय, इथं इथं दाटून येतंय.

**बीना** : होय का? मग आता तू रस्त्यानं प्रेमभंगाच्या कविता गात हिंडणार वाटतं?

**सुरेश** : अग हल्ली रस्त्यात जागा कुठाय? ज्या रस्त्यावर पाहावं त्या रस्त्यावर ही गर्दी! त्यात बायका-लहान, मोठ्या, तरुण, प्रौढा - रस्त्यात बायका दिसल्या ना... आणि हल्ली सगळ्याच बायका सरळ रस्त्यावर आल्यात आपले प्रश्न सोडवायला - तर, रस्त्यांत बायका दिसल्या ना की मला पुरुष दिसत नाहीत, मोटारी दिसत नाहीत, दुकानं दिसत नाहीत...

**बीना** : आणि तरीही तुझं माझ्यावर 'प्रेम' आहे!

**सुरेश** : कारण डोळे झाकले म्हणजे फक्त तूच दिसतेस!

**बीना** : मग डोळ्यांवर पट्टी बांधून ठेव की गांधारीसारखी!

**सुरेश** : तुझं माझं नातं धृतराष्ट्र-गांधारीसारखं झालं तर ते ठीकच होईल. नाही तरी, प्रेम डोळसपणानं केलं तरी लग्न डोळे मिटूनच करावं लागतं!

**बीना** : चला, माझ्या बाबतीत तरी आता तुझ्यावर ही पाळी येणार नाही.

**सुरेश** : अग तुझं हे लग्न पाहून मला खरंच डोळ्यांवर पट्टी बांधून टाकावीशी वाटू लागलीय.

**बीना** : का? बघवत नाही माझं लग्न? प्रत्येक पुरुषाला वाटतं की प्रत्येक स्त्री आपल्याला मिळावी? हुं! बघवत नाही दुसऱ्याचं सुख?

**सुरेश** : अग सोड! मी तर म्हणतो -
हे प्रिये, देऊन टाक तुझे दुःख मला अन् घेऊन जा माझे सुख तुला
तुझ्या दुःखातही सुख मला अन् तुझ्या सुखातही सुखच मला!

**बीना** : होय ना, मग सुखानं एखाद्या पर्वतावर जा...

**सुरेश** : हिमालयात?

**बीना** : हिलस्टेशनवर? अन् काव्य कर. मोठं काव्य कर. मेघदूतासारखं. अन् खपव बाजारात. तुला फायदा झाला म्हणजे मलाही मोठा आनंद होईल तुला चार पैसे मिळवून दिल्याचा. रॉयल्टी नाही मागणार मी! जा लवकर!

**सुरेश** : अग तू आनंदी होशील पण मी नाही आनंदी होणार!

**बीना** : म्हणजे? तू म्हणालास ना, 'तुझ्या सुखातच सुख मला?'

**सुरेश** : पण तू खरोखरीच सुखी होणार आहेस का हे लग्न करून?

**बीना** : हे तू ठरवणार?

**सुरेश** : आता. पसंती ज्यांची त्यांनीच ठरवायची, पण 'जोडा लक्ष्मी-नारायणासारखा दिसतो' असं म्हणायचं दुसऱ्यांनीच ना? का त्यांनीच? 'पाहा, पाहा, आमचा जोडा लक्ष्मी-नारायणासारखा दिसतो आहे हो!'

**बीना** : ही नसती उठाठेव तुला कशाला? आम्ही लक्ष्मीनारायणासारखे दिसू नाही तर चंडीशंभूसारखे दिसू? तुला काय करायचंय? तू जा इथून.

**सुरेश** : नाही नाही, तुमचा जोडा दिसणार लक्ष्मीनारायणासारखाच! कारण तू लक्ष रुपयांची स्वामिनी म्हणून लक्ष्मी आहेसच आणि तोही गर्भश्रीमंत नवकोटनारायण आहे. तेव्हा तुम्ही दिसणार लक्ष्मीनारायणासारखेच!

**बीना** : मग तुझ्या का पोटात दुखतंय?

**सुरेश** : माझ्या पोटात मुळीच दुखत नाही. आणि दुखणं शक्यच नाही. या जन्मात शक्य नाही ते.

**बीना** : खोटं. मत्सर वाटतोय तुला. आणि म्हणून माझं लग्न मोडायला आला आहेस तू.

**सुरेश** : आता तुझं लग्न लावायला मी काही भटजी नव्हे!

**बीना** : पण आहेस एखाद्या भटजीसारखाच-लोचट अन् दरिद्री!

**सुरेश** : हां! हे मात्र तू खरं बोललीस. म्हणजे मी आहेच दरिद्री-पैशानं. आणि म्हणून तू मला बाजूला सारलंस आणि त्याला स्वीकारलंस!

**बीना** : तो माझा प्रश्न होता.

**सुरेश** : पण उत्तर मी सांगितलं तेच आहे.

**बीना** : मग मिळालंय ना तुला उत्तर? झालं तर!

**सुरेश** : पण जीवनाची कहाणी या एका उत्तरानं सुफल संपूर्ण होणार नाही बीना.

**बीना** : कुणाच्या जीवनाची? तुझ्याच ना?

**सुरेश** : माझ्या, तुझ्या, आपल्या -

**बीना** : तुझे आणि माझे मार्ग आता निराळे आहेत. का उगीच स्पष्ट बोलायला लावतोस?

**सुरेश** : तुला का वाईट वाटतंय असं तोडताना? नुसतं रागावून का बोलत नाहीस तू?

**बीना** : बायका नाही तसं बोलत.

**सुरेश** : खोटं. तू फसवते आहेस मला आणि तुला!

**बीना** : मुळीच नाही. मला आता साक्षात्कार झालाय, माझा जन्म कलेसाठी आहे. मला खूप चांगलं गाणं शिकायचंय, खूप सुंदर नृत्य करायचंय, खूप छान अभिनय करायचा आहे...

**सुरेश** : आणि म्हणून तू सुधाकररावांशी लग्न करणार आहेस?

**बीना** : होय, ते माझ्या ध्येयाशी समरस झालेत. ते म्हणाले, 'तू खूप खूप कलाविलास कर, खूप खूप कीर्ती मिळव...'

**सुरेश** : 'अन् खूप खूप संपत्ती कमव!'

**बीना** : सुरेश!

**सुरेश** : सुधाकरांना मी चांगलं ओळखतो.

**बीना** : मुळीच नाही.

**सुरेश** : कशावरून?

**बीना** : असं जुनाट नाव आवडत नाही त्यांना. आपलं नाव त्यांनी किती कलात्मक करून घेतलंय. मला भारी आवडलं. टागोरांनी जसं आश्रमाचं नाव कलात्मक ठेवलंय ना, तसंच त्यांनी स्वतःचं नाव मोठं कलात्मक केलंय. आणि आज ते मला माझंही नवं नाव सांगणार आहेत. आज ते आत्ता अंगठी आणणार आहेत माझी - माझ्या लग्नाची.

**सुरेश** : ओहो! अभिनंदन! पण त्यांचं ते कलात्मक नाव तर सांगशील? चुकलो! नाव घेशील! उखाणा आठवते आहेस?

**बीना** : उखाणा बायकांच्यात घेतात! तू काय बाई आहेस? पण बायल्या मात्र आहेस. इतका वेळ बोलत बसला आहेस!

**सुरेश** : बायल्या म्हणू नकोस. माझं काय, माझं काम झालं की मी निघालो.

**बीना** : कसलं काम?

**सुरेश** : तू ते शुभनाम तर सांग!

**बीना** : (लाजून) सुधन!

**सुरेश** : माझ्या मनातलंच बोललीस!

**बीना** : म्हणजे? तुला हे नाव नवीन नाही वाटलं? 'सुधन' नाव कधी ऐकलं होतंस कुठे? किती गोड वाटतं?

**सुरेश** : 'सुधन!' कसं रुपया खणकन पडल्यासारखं वाटतं! अक्षरं नवीन आहेत पण वृत्ती जुनीच आहे! पैसा, पैसा आणि पैसा! हा माणूस पैशासाठीच जन्माला आलाय बीना. कोणत्याही पूर्ण पुरुषापेक्षा अर्धा नया पैसासुद्धा प्यार आहे त्याला. बरोब्बर! सुधन!

**बीना** : चुकतोस तू. ते माझ्यासाठी जन्माला आलेत. त्यांचा सगळा पैसा माझ्यासाठी आहे, माझ्या कलेसाठी आहे -

**सुरेश** : त्यातून आणखी पैसा मिळवण्यासाठीच-

**बीना** : तोही माझ्या कलेसाठीच-

**सुरेश** : त्यातून आणखी पैसा मिळवण्यासाठीच. तू कलेसाठीच आणि तो पैशासाठीच! तुमची गाठ उभ्या जन्मात कधी पडायची -

**बीना** : बोलू नकोस पुढे. शपथ आहे माझी तुला. तू आता जा. आत्ता येणार आहेत ते. आमची गाठ आत्ता पडायची आहे अन् जन्मोजन्मी राहायची आहे. तुझ्या देखत नको ती. तू जा; अन् एखाद्या चांगल्या मुलीबरोबर...

**सुरेश** : चांगल्या म्हणजे गरीब...

**बीना** : चांगल्या मुलीबरोबर...

**सुरेश** : चांगल्या म्हणजे कलेची ओढच नसलेल्या...

**बीना** : चांगल्या मुलीबरोबर...

**सुरेश** : येईल त्या संसारात सुखी असलेल्या, नवीन काही शिकायला नको असलेल्या, तशी कुवतच नसलेल्या, आणि नवऱ्यालाही तशाच संसारात डांबून ठेवणाऱ्या एखाद्या अळणी जगदंबेशी शरीर-संबंध...

**बीना** : बरं, अगदी एखाद्या माझ्यासारख्या...

**सुरेश** : मला अगदी तुझ्यासारखी बायको मिळावी असं तुलासुद्धा वाटतं ना?

**बीना** : वाटतं ना.

**सुरेश** : आहे एक अशी मुलगी माझ्या पाहण्यात.

**बीना** : होय ना! कोण ती? करून टाक लवकर लग्न.

**सुरेश** : अशा मुलीशीच माझं लग्न व्हावं असं तुला वाटतं ना?

**बीना** : होय ना!

**सुरेश** : बीना, अगदी तंतोतंत तुझ्यासारखी दुसरी मुलगी या जगात कुठली आलीय! बीना, तुझं अंतर्मन आपलाच दोघांचा विवाह व्हावा असंच बोलतंय. पण तू का ते नाकारते आहेस?

**बीना** : आली तुझी मूळकथा पुनः पदावर? हरदासबुवा, साष्टांग नमस्कार तुम्हाला. आता कीर्तन संपलं. चला. जा.

**सुरेश** : कुठं जाऊ?

**बीना** : खाणावळीत. भरपूर जेव आणि गाढ झोपी जा. जा म्हणते ना. (तो उभा. हलत नाही.) जा म्हणते ना. (तो बसतो.) जा म्हणते ना. (तो बद्धपद्मासनस्थ.) अरे, हे काय? ते आत्ता येतील ना! हे काय?

**सुरेश** : ही प्रेमसमाधी.

**बीना** : अरे, असं रे काय अगदी. उठ ना? तुला हलवू तरी कसं? काय हे?

**सुरेश** : हा प्रेमासाठी प्राणांतिक सत्याग्रह.

**बीना** : अगबाई! माझेच प्राण कंठाशी आले! ते आले म्हणजे?

**सुरेश** : काय प्राण?

**बीना** : नाही रे, 'ते'!

**सुरेश** : ते आले की ओळख करून दे की हे ते आणि त्यांना सांग की ते हे. आणि तू हे चित्र पाहा आणि ते चित्र पाहा.

**बीना** : नको रे. दया कर माझ्यावर, तुझं माझ्यावर प्रेम आहे म्हणतोस ना? मग माझं एवढं ऐक.

**सुरेश** : कोणत्या नात्यानं?

**बीना** : अं-मैत्रीच्या.

**सुरेश** : मी तुझा मित्र ना? मग दे की माझी 'त्यांच्या'शी ओळख करून तशी.

**बीना** : देईन रे. पण इथं नको. अशी नको. गैरसमज होईल त्यांचा.

**सुरेश** : गैरसमज कसा होईल? त्यांची खात्री पटेल की आपली मैत्री चांगलीच पक्की आहे म्हणून. आपण त्यांना सांगू की आमची मैत्री अगदी शुद्धविशुद्ध आहे म्हणून!

**बीना** : नको रे.

**सुरेश** : काय? मैत्री शुद्ध नको?

**बीना** : शुद्ध हवी रे; पण मैत्री नको.

**सुरेश** : तुला खरंच शुद्ध हवी आहे! शांत हो, जागी हो!

**बीना** : ते एवढ्यात येतील! आलेच वाटतं. कशी शांत होऊ? ऊठ रे. जा ना. पुनः ये; पण आत्ता जा.

**सुरेश** : मी जात नाही आणि तो येत नाही.

**बीना** : कशावरून?

**सुरेश** : अग ही वेळ शेअर बाजारात भाव ठरवायची आहे. यावेळी तुझा तो शेअरसिंह त्या जंगलात असणार.

**बीना** : पण त्यांनी मला वचन दिलंय. मी वचन घेतलंय त्यांच्याकडून. सगळी कामं बाजूला ठेवून येणार आहेत ते.

**सुरेश** : तुला त्यांनी वचन दिलंय? अग, दारूड्याचं दारू सोडण्याचं वचन आणि सटोडियाचं सट्टा सोडण्याचं वचन एकच.

**बीना** : लग्नाच्या वचनापेक्षा सट्ट्याचं वेड जास्ती असतं?

**सुरेश** : तुझं कलेचं वेड माझ्या प्रीतीच्या वेडापेक्षा जास्त आहे ना?

**बीना** : प्रीती नव्हे. मैत्री म्हण. तुम्हा पुरुषांची दृष्टीच वाईट. तुझ्याशी मी बोलले चालले म्हणजे काय मी तुझीच झाले? बायकांनी बोलू नये पुरुषांशी? पुरुषच मेले बायकांना पडद्यात ठेवीत; बुरख्यात ठेवीत; घरात अडगळीत ठेवीत. जुने काय अन् नवे काय? सगळेच पुरुष सारखेच!

**सुरेश** : मुळीच नाही. मैत्री आणि प्रीतीतला फरक मला कळत नाही की तुला कळत नाही? मैत्रीचं प्रीतीत रूपांतर झालं ते तुझ्या हातांत नव्हतं. पण नैसर्गिकपणे उमललेल्या फुलाच्या पाकळ्या तू पुनः का मिटवू पाहतेस? त्या फुलाचा सुगंध तू का नाकारतेस? त्या फुलाचं फुलणं तू का पाहत नाहीस? तुझ्या कलेच्या सोनेरी केसांना भूषवायला हे प्रीतीचं पुष्प नको का?

**बीना** : प्रीती प्रीती प्रीती काय पिरपिर रे? सगळी तुझीच कविकल्पना. म्हणे, प्रीती! मी तशी काहीतरी कृती केली होती का?

**सुरेश** : स्त्री ही काव्याचा विषय असते. पण काव्यमय मात्र नसते!

**बीना** : पुरुष काव्य करतात आणि खड्ड्यात पडतात!

**सुरेश** : आता धक्का दिल्यावर कोण पडणार नाही? अग एखादा पुरुष एखाद्या बाईला चुकूनचुकून कधीतरी धक्का देतो. पण तुम्ही बायका आम्हांला सारखेच धक्के देत असता!

**बीना** : (हसून) खूप खाल्लेस वाटतं?

**सुरेश** : आता आता सुरुवात झालीय तुझ्यापासून. माझ्या हातात किती

बायका आहेत कुणास ठाऊक?

**बीना** : हातात?

**सुरेश** : म्हणजे (कपाळावर हात मारीत) भविष्यात! पण तुझ्यासारखी कोणीच असणार नाही! अशक्य! अग तू असा काही जबरदस्त धक्का देऊन ठेवला आहेस की यापुढं दुसऱ्या कोणत्याही बाईचा धक्का मला मुळीच जाणवणार नाही.

**बीना** : आता मात्र खरंच तुला धक्का मारूनच घालवलं पाहिजे.

**सुरेश** : आहाहा! जरूर मार. कुठे उभा राहू? कसा उभा राहू? कशी पोज देऊ?

**बीना** : चिकट मेला.

**सुरेश** : अग पुरुष लग्नाआधी चिकटतो. बायका लग्नानंतर चिकटतात. दोघेही चिकटच.

**बीना** : ईऽऽ! थांब. आत्ता हे येतीलच. त्यांनाच सांगते.

**सुरेश** : तो आल्यावर धक्का देईल हे खरं. पण मला की तुला? तू त्याला सांगणार ना? मी पण त्याला सांगतो!

**बीना** : काय सांगशील रे?

**सुरेश** : बीना, तुला आठवतं, कॉलेजच्या स्नेहसंमेलनात आपण 'रुक्मिणी-स्वयंवर' केलं होतं. तू रुक्मिणी अन् मी कृष्ण. तू मला विंगमध्ये अगदी जवळ उभं राहायला सांगायचीस आणि रंगमंचावरून माझ्याकडे हसून पाहून लाजून चूर होऊन तिकडे म्हणायचीस, 'दादा, ते आले ना!'

(बाहेर पावले वाजतात.)

**बीना** : अरे, खरंच ते आले ना! सुरेश-

**सुरेश** : मी काही तुझा 'दादा' नव्हे!

**बीना** : अरे खरंच ते आले ना!

**सुरेश** : मग म्हण ना, ''सख्या, ते आले ना!''

**बीना** : सुरेश, सुरेश

(बाहेरून 'टाइम्स' असा पुकारा होतो आणि वृत्तपत्र दारावरून येऊन दोघांच्या अंगावर पडते. ती हुश्श करीत खाली बसते. तो 'टाइम्स'ने तिला वारा घालतो.)

**सुरेश** : तसंच आपल्या कॉलेजची ट्रिप म्हैसूरला गेली होती. वाटेत आगगाडीत रात्री बरोबरच्या सगळ्यांना गाढ झोप लागली. उत्तर-गोग्रहणाच्या वेळी अर्जुनानं शत्रूवर मोहिनीअस्त्र टाकून सर्वांना झोपवलं होतं ना

तशी. अगदी खुश्शाल कुणाचीही कोणतीही वस्त्रं काढून घ्यावीत. आपण दोघेच फक्त जागे होतो. न ठरवता. आपोआप. पण आपण काही दुसऱ्या कोणाच्या वस्त्राला हात लावला नाही! आपण दोघं आगगाडीच्या दारात बाहेरची शोभा पाहत राहिलो. मी म्हटलं, 'उभी राहून तू दमशील ना.' इतक्यात गाडीला रूळ बदलल्याचा धक्का बसला अन् तू माझ्या अंगावर कलंडलीस. मी तुला सावरली अन् तू तशीच किती वेळ राहिलीस. तसंच अनंतकाळ राहावंसं वाटत होतं. पण दूर क्षितिजावर तांबडं फुटलं. मी म्हणालो, 'काढ सखे गळ्यातील तुझे चांदण्याचे हात!' अन् तू उसासून म्हणालीस, 'क्षितिजाच्या पलीकडे उभे दिवसाचे दूत!'

(दोघेही क्षणभर तन्मय. इतक्यात बाहेर बूट वाजतात.)

**बीना** : ते आले की रे.

**सुरेश** : काढ सखे गळ्यातील तुझे चांदण्याचे हात.

**बीना** : ते आले रे.

**सुरेश** : व्हरांड्यात वाजतात नवऱ्याचे काळे बूट!

(बेल वाजते. 'पोस्टमन' पुकारा होतो. ती पुढे होऊन डाक घेऊन येते.)

**सुरेश** : बरीच मोठी डाक दिसते. पत्रं दिसतात, अभिनंदनाची. बाकी, लग्न कुणाशीही ठरलं तरी अभिनंदनं हमखास मिळतातच.

**बीना** : सुरेश, आता मी रडेन हं.

**सुरेश** : थांब. रडू नकोस. हास. ही तुझी हसण्याची वेळ आहे. पानशेत फुटलं की पुणंसुद्धा वाहून जातं. अश्रूंचा पूर आला की मीसुद्धा वाहून जातो. मी जातो. तू सुखात राहा!

**बीना** : तू सुखात राहा.

**सुरेश** : 'तू सुखात राहा!' अवतरणचिन्हांत की अवतरणचिन्हांबाहेर? म्हणजे, माझेच शब्द स्वतःशी पुटपुटलीस की 'मलाच' काही म्हणालीस?

**बीना** : तुलाच म्हणाले मी.

**सुरेश** : तुझ्या मनात माझ्याविषयी अं सदिच्छाच आहेत हे माहीत आहे मला. तसा मी तुझा आवडता आहेच. काही काळजी करू नकोस. मी अगदी मजेत राहतो बघ. तू पण मजेत राहा. अच्छा! बाय बाय! टाटा! वुइश यू अ हॅपी अँड लाँ ऽऽग मॅरेज.' (जातो.)

**बीना** : (पत्रं वाचीत) इतकी लोकं माझं अभिनंदन करतात. मग मी चूक कशी असेन? पण सुरेशचं काय होईल? काही वाईट होणार नाही.

इतका विनोदी आहे. काही तरी विनोदीच करील. कशाचं गांभीर्यच नाही त्याला. हे पत्र... छान! शाळेतल्या माझ्या नोकरीचा राजीनामा स्वीकारल्याचं! किती मोकळं मोकळं वाटतंय! ती पुस्तकं, त्या वह्या, ते कॅटलॉग्स! गेले सगळे रद्दीत! आता अंगावर अगदी काही नाही असं वाटतंय. कित्ती छान वाटतंय!... आणि हे पत्र. हं! या जगात वाटेल तेवढे चांगले मित्र मिळतील. सुरेशसारखे. पण चांगले नातेवाईक काही मिळायचे नाहीत. चांगले नातेवाईक मिळणार कसे? ते नुसते असणारच! एवढं माझं वारसा हक्काचं हे लाखाचं घर, पण बघवत नाही त्यांना. कोर्टात चाललेत घर घ्यायला. घ्या म्हणावं. खुशाल घ्या. आता मी नव्या घरी जाणार! हे जुनं घर. असलं काय न् नसलं काय! कसं असेल माझं नवं घर? कसं असणार? मीच सजवणार ते. पुरुषांना या बाबतीत काही कळत नाही.

**कसे असावे माझे नव घर**
**नव्हेच घर ते ते तर मंदिर**
**सुंदर सुंदर त्याचे अंतर**
**त्यात कलेचे रंगतील सूर**
**रंगकलागंधांचा संगम**
**पूजिन तेथे मी पुरुषोत्तम**

त्या नव्या घरात मी त्यांची पूजा करायची म्हणते, पण अजून त्यांचा पत्ता आहे का? आता आले की बोलतच नाही. रागावली आहे मी. अहो, मी तुमची पूजा करणार आहे पूजा! ताबडतोब या आणि मुकाट्यानं इथं बसा. देवासारखे! इतक्या हाका मारून खराखुरा देवसुद्धा आला असता. त्याला थोडंच शेअर बाजारात जायचंय? हुंः देवाची आठवण करता करता शंखाची मात्र आठवण होऊ लागली आहे. (बाहेर हॉर्न वाजतो.) अगबाई! शंखाचा आवाज! शंख कुणी वाजवला की मला भास झाला? (पुन्हा हॉर्न) इश्श! शंख काय म्हणते मी? यांचाच हा हॉर्न. यांचा म्हणजे यांच्या गाडीचा. ते डोअरबेल वाजवून थोडेच येणार? ते गाडीचा हॉर्न वाजवून येणार! आता मी काय करू? हा चेहरा मेला ओघळला. हे पातळ मेलं चुरगाळलं. आता काय करू? आणि इकडे हसू येऊ लागलं आहे मला. हसू की रुसू? पण रुसायचं ठरवलं आहे ना मी? (बाजूला बसते.)

**सुधन** : (खिसे चाचपत येत) बीना, बीना, बीना – अग जागी आहेस की नाहीस? झोप लागली की काय तुला? मी आलोय. नाही, पण

अशा अवस्थेत झोप कशी लागेल? मग, कसली तंद्री लागली की काय? बीना... अरे, हालत नाही, बोलत नाही. बीना, अग जिवंत आहेस की नाहीस?

**बीना** : चांगली पक्की जिवंत आहे. बोलू नका माझ्याशी.

**सुधन** : आता जिवंत माणसाशी बोलायचं नाही, मग काय जिवंत नसलेल्यांशी बोलायचं?

**बीना** : बोला तुमच्या पैशांशी. ते बोलतातच खण् खण्.

**सुधन** : नाही ग. नोटा कशा खण् खण् वाजतील? आणि चिल्लर तर मिळतच नाही.

**बीना** : मग बसा बोलत स्वतःशीच. मला नका बोलायला लावू.

**सुधन** : अग थोडं चिल्लर तरी बोल.

**बीना** : थिल्लरपणा नका करू. माझं डोकं दुखतंय.

**सुधन** : मग दाबून धरू का? थांबेल जरा वेळानं. फुकटचा उपाय.

**बीना** : माझं डोकं फुटायला लागलंय.

**सुधन** : मग रुमालानं बांधून ठेवू का?

**बीना** : अहो, माझ्या डोक्यात घणाचे घाव बसताहेत.

**सुधन** : हां. मग ॲस्प्रोच पाहिजे. सोळा पैशाला दोन गोळ्या. किती महाग! अगदी आणल्याच पाहिजेत का? आणतो गरीब बापडा. काम करून पैसा मिळवायचा तर डोकी ठिकाणावर पाहिजेतच. जातो.

**बीना** : काही नको. माझं डोकं नाही दुखत. मी रुसून बसले आहे.

**सुधन** : मग हे आधी नाही का सांगायचंस? इतका वेळ फुकट गेला नसता.

**बीना** : अहो पण 'का' नाही विचारलंत?

**सुधन** : का?

**बीना** : 'अगदी नक्की लवकर येतो' म्हणून वचन दिलं होतंत. किती वाट पाहायची आम्ही? लग्नाला तरी मुहूर्तावर येणार आहात का?

**सुधन** : अग लग्नाचा मुहूर्त काय केव्हाही काढता येईल. पण पैसा मिळविण्याचा मुहूर्त सोडून चालेल का?

**बीना** : माझ्यापेक्षा तुमचं त्या पैशांवरच प्रेम.

**सुधन** : अग पण तो सगळा पैसा तुझ्यासाठीच ना? मी काय आणलंय बघ. डोळे मीट. (ती डोळे मिटते. तो नोटांच्या पुडक्यांचा हार तिच्या गळ्यात घालतो. ती डोळे उघडते. लाजते.)

**बीना** : आता तुम्ही डोळे मिटा. मी काय देणार आहे तुम्हाला?

**सुधन** : काय तूच सांग. (तो डोळे मिटतो. ती तोच हार त्याच्या गळ्यात घालते. दोघे हसतात.)

**सुधन** : (हार गळ्यात ठेवून) मी तुला दहा हजार रुपये दिले. तू मला दहा हजार रुपये दिलेस. म्हणजे आपले वीस हजार रुपये झाले! आहे की नाही गंमत? ही गंमत करता यावी म्हणून मी जरा उशीर करून पैसे कमावून आणले आणि तू रुसून बसलीस? अग तू माझी लक्ष्मी ना? आज तर माझ्यावर लक्ष्मी प्रसन्न झाली आहे आणि मग तू रुसतेस कशी? मी तुला साक्षात लक्ष्मी करून सोडीन! सोन्यामोत्यांनी मढवीन! पण लक्ष्मी कशी नेहमी प्रसन्न पाहिजे राजा रविवर्म्याच्या चित्रातल्यासारखी.

**बीना** : (हसून) पण एवढा पराक्रम काय केलात तो तरी सांगा. एका दिवसात तुम्ही दहा हजार रुपये मिळवलेत? बाई बाई बाई!

**सुधन** : एका दिवसात नव्हे, एका तासात!

**बीना** : अग बाई!

**सुधन** : माझ्या हातात तसंच यश आहे!

**बीना** : अहो, केलंत तरी काय?

**सुधन** : लॉटरी जिंकली! गेल्या वेळच्या लॉटरीत मी हजार रुपये जिंकले होते. या वेळच्या लॉटरीत मी दहा हजार जिंकले. पुढच्या लॉटरीत नक्की लाख रुपये जिंकणार! माझा प्रयत्नच तसा आहे. यत्न तो देव जाणावा! धंद्यात धंदा लॉटरीचा. सगळ्यांत चांगला धंदा. बाकी सगळे धंदे बंद करून हाच एक धंदा सुरू केला पाहिजे.

**बीना** : अगबाई! सगळ्यांनी?

**सुधन** : छे छे! फक्त आपण दोघांनी! बाकी सगळ्यांनी बाकी सगळे धंदे केले पाहिजेत!

**बीना** : अहो पण असा पैसा मिळवायचा तरी किती?

**सुधन** : अग तूच म्हणतेस ना, प्रेमासाठी प्रेम, कलेसाठी कला, तसंच पैशासाठी पैसा! जशी हवा, जसं पाणी, तसा पैसा पाहिजे. पण हल्लीच्या या काळात हवासुद्धा दूषित होऊ लागली आहे आणि पाणीसुद्धा दुर्मिळ झालं आहे. म्हणूनच भरपूर पैसा साठवून ठेवला पाहिजे. आता तू माझ्या फ्लॅटमध्ये राहायला आलीस ना, की तुझ्या या घराचं आपण गोडाऊनच करू या!

**बीना** : इश्श! गोडाऊन? आणि माल कसला भरायचा?

**सुधन** : नोटा! आधी शंभराच्या! त्यांनी घर भरलं की त्या काढून टाकायच्या आणि हजाराच्या नोटा घ्यायच्या. त्यांनी घर भरलं की त्या काढून टाकायच्या आणि दहा हजाराच्या नोटा घ्यायच्या!

**बीना** : बाई बाई बाई! आणि त्यांचं करायचं तरी काय?

**सुधन** : आता तूच सांग. या जगात आणि या देशात कशाची तरी खात्री आहे का? बँकांत पैसा ठेवला की इन्कमटॅक्स ऑफिसला वास लागलाच. कुत्र्यांसारखा वास येतो त्यांना. लगेच 'कर भरा' म्हणून नोटिसा येतात. आम्ही लाखाचे पाच लाख करायचे आणि त्यांतले दोन लाख सरकारला द्यायचे? कशाकरता? राष्ट्रावर काय आमचं प्रेम नाही? आम्ही काय राष्ट्रीय संपत्ती वाढवीत नाही? मग आम्ही राष्ट्रीय संपत्ती वाढवायची ती वाढवायची आणि वर करसुद्धा भरायचे? काय अन्याय आहे हा! आणि आता म्हणे विषमता नष्ट होणार, समता प्रस्थापित होणार, सगळ्यांचं राष्ट्रीयीकरण होणार! म्हणजे सगळ्यांचंच मरण! सर्वांना जीवनाची हमी मिळून काय उपयोग? अन्न, वस्त्र, निवारा म्हणे सर्वांनाच मिळणार! मग त्यात काय फायदा आहे? सगळेच सारखे झाल्यावर राष्ट्राची उंची वाढणार कशी? ऑलिंपिकमधील विक्रम काय सगळे लोक करतात? एकेकच माणसं करतात. तसे आम्ही एकेकटेच श्रीमंत झालो म्हणून लोकांच्या पोटांत का दुखतं? खरं तर या श्रीमंत होण्याच्या उच्चांकाबद्दल सगळ्या जगानं आम्हाला सुवर्णपदकं बहाल करायला हवीत! पण या जगात न्याय आहे कुठं? त्यांतल्या त्यात या हिंदुस्थानात तर न्यायच नाही. म्हणून मी ठरवलंय की पहिल्या प्रथम काय वाटेल ते करून दहा लाख रोख जमा करून ठेवायचे. एक लाख मी माझ्या वडिलांकडून वारसा हक्कानं मिळवलेच आहेत. एक लाख तुझ्याकडून हुंडा मिळणारच आहे! असे दोन लाख आपल्या कमाईचे आपल्यापाशी आहेतच. आता शेअरबाजार, सोनंचांदी, जमीनजुमला, मटका–लॉटरी अशा धंद्यांची एकच गर्दी उडवून देऊ की हा हा म्हणता दहा लाख जमा होतील. मग चार लाख हळूच अमेरिकेतील बँकेत पाठवून द्यायचे. पण अमेरिकेची तरी काय खात्री? काय गडबड होईल तिथे कुणास ठाऊक? म्हणून चार लाख स्वित्झर्लंडच्या बँकेत ठेवून द्यायचे. खोट्या नावानं. असे पैसे अमेरिकेत आणि स्वित्झर्लंडमध्ये ठेवून दिले की आपण पुनः गरीब होणार! मग पुनः लाखाचे दोन

लाख करून करून दहा लाख मिळवून ठेवायचे! दहा लाख झाले की जगातल्या बँकांत ठेवायचे. हे विश्वचि माझे घर! उरलेल्याचे पुनः दहा लाख करायचे! दहा लाख झाले की पुनः जगात पाठवायचे! उरलेल्याचे पुनः दहा लाख करायचे!

**बीना** : अहो हे संपायचे कधी?

**सुधन** : संपायचं कशाला? हेच जीवनचक्र! अशीच त्याची गती वाढवायची! जितके पैसे भराभर मिळतील तितकी त्याची गती वाढणारच! आहाहा! हवेसारखा पैसा हवा! मोटार वेगात चालली की हवा सुसाट येते तसं धंदा जोरात सुरू झाला की पैसा पिसाट येत राहणार! काय मज्जा आहे!

**बीना** : पण मी माझी कलासाधना केव्हा करू? मला गाणं शिकायचंय, नृत्य करायचंय, अभिनय दाखवायचाय.

**सुधन** : उत्तम! मग तर जीवनात अर्थच अर्थ येईल. अग या सगळ्या कलांना हल्ली जगात फार मान आहे, फार मागणी आहे. तू सिनेमात काम कर. माझ्या ओळखी खूप आहेत. एकेका सिनेमातच दहा दहा लाख मिळतात. शिवाय बिनपावतीचे कित्येक लाख मिळतात. फार उत्तम! तू सिनेमात पड.

**बीना** : शी शी! मी नाटकात उभी राहणार आहे!

**सुधन** : अग सिनेमात दहा दहा लाख मिळतात.

**बीना** : पण तिथं कलेची राख होते.

**सुधन** : अग नाटकं म्हणजे नुसती रडारड.

**बीना** : मी नाटकात रडेन. पण सिनेमात हसणार नाही.

**सुधन** : ठीक आहे. आपण पैसा मिळवणारी नाटकंच निवडू या. अग हल्ली काही काही नाटकंसुद्धा वयात आली आहेत. वयात आल्याचा फायदा घेऊन पैसे लुबाडणाऱ्या स्त्रीपुरुषांप्रमाणंच ती नाटकंसुद्धा खोऱ्यानं पैसा ओढतात. नाटकात काहीतरी भलताच विकृत लैंगिक विषय ठेवायचा. उलटसुलट जाहिरात करायची, मोठा दौरा काढायचा, की ट्रक भरून पैसे आणायचे. ट्रंक भरून नव्हे, ट्रक भरून. तू नाटकं कर. मी पैसे जमा करतो. जोरात कामं सुरू! केव्हा सुरुवात करणार बोल.

**बीना** : अहो, अजून आपलं लग्न व्हायचंय, आपल्याला महिनाभर हनीमूनला जायचंय, मग हळूहळू संसार उभा करायचा आहे, मग कलासाधना

करायची आहे, मग नाटकं...

**सुधन** : अरेरे! आधी लग्न, मग हनीमून, मग संसार, मग कलासाधना, मग नाटकं... छे छे छे! मग म्हातारपण होईल. इतकं सावकाश करून नाही चालणार. लग्न, हनीमून, संसार, सगळं आता जोरात केलं पाहिजे. चल, चल, चल. चटकन लग्न करून टाकू, पटकन हनीमून करू, झटकन संसार करू की खटकन नाटकं करू. चल, चल, चल.

**बीना** : अहो पण लग्नाचा मुहूर्त अजून लांब आहे ना! तो आधी कसा येणार!

**सुधन** : लग्नाला मुहूर्त कशाला पाहिजे? बिनमुहूर्ताचं लग्न का होऊ नये! ठरलं की लागलं! हा मुहूर्तच लग्नाच्या आड येतो आहे! काय हा धर्म! हा जुनाट धर्म टाकून दिला पाहिजे. नवीन क्रांती केली पाहिजे.

**बीना** : अहो पण मुहूर्तावर सगळे लोक गोळा होणार...

**सुधन** : लग्नाचा आणि लोकांचा काय संबंध? तूच सांग. लग्न तुझं आणि माझं. होय ना? त्यात लोक कशाला? जितके लग्नात लोक, तितका खर्च रोख! छे छे! हे लोक लग्न लावीत नाहीत. लग्नाआड येताहेत. काय हा समाज! बेदर्द जमाना क्या जाने!

**बीना** : अहो, पण हे लोकच अभिनंदनं करतात! ही पाहिलीत का अभिनंदनपर पत्रं? नुसतं लग्न ठरल्यावर इतकी पत्रं! पाऊस पडलाय नुसता! मग लागल्यावर तर किती अभिनंदन होईल!

**सुधन** : कशाला ही पत्रं वाचण्यात वेळ खर्चायचा? हे कोरडं अभिनंदन काय कामाचं?

**बीना** : अहो, हेच लोक लग्नाला येताना प्रेझेंट्स आणतीलच की!

**सुधन** : दॅट्स इट! नाहीतरी लग्नाच्या दिवशी दुसरा धंदा होणार नाहीच. तोटाच होणार. तेव्हा प्रेझेंट्स चिक्कार मिळालीच पाहिजेत. प्रेझेंट्स मिळवणे हा लग्न करणाऱ्यांचा लग्नसिद्ध अधिकार आहे आणि तो मी मिळविणारच! पण काय हे लोक! हल्ली 'प्रेझेंटस आणू नयेत' असं लग्नपत्रिकांवर छापू लागलेत! हल्ली मी जी जी लग्नपत्रिका पाहिली तिच्यावर आपलं छापलेलं – 'प्रेझेंटस आणू नयेत – कृपया!' मी अशा प्रत्येक लग्नाला गेलो. भरपूर खाल्लं–आग्रहच होता– अन् छापल्याप्रमाणंच केलं. 'प्रेझेंटस आणू नयेत' आणली नाहीत. पण लोक हे आपल्यावेळी तर लक्षात ठेवणार नाहीत ना?

**बीना** : अहो माझ्या मित्रमैत्रिणी अन् नातेवाईक तर 'प्रेझेंटस आणू नयेत' असं छापलं तरी खूप खूप प्रेझेंटस आणतील!

**सुधन** : मग न छापल्यावर तर किती आणतील?

**बीना** : आपण छापू या गडे – 'कृपया, प्रेझेंटस आणू नयेत.' छापू या गडे. बरं दिसतं.

**सुधन** : नको. नको. ते बरं नसतं. धोक्याचं असतं. मी तर म्हणतो, सरळ छापावं, 'कृपया, प्रेझेंटस आणावीत.' नाहीतर असं छापावं, 'लग्नाला यायचं असेल तर प्रेझेंटस आणा!' पण अशानं एखादेवेळी लोक येणारच नाहीत! मग? हां. असं– 'लग्नाला अवश्य या आणि प्रेझेंटस अवश्य आणा!'

**बीना** : अहो हे बरं दिसत नाही.

**सुधन** : खरंच बरं दिसत नाही.

**बीना** : काय?

**सुधन** : लोक तीच तीच प्रेझेंटस आणतात! डझनभर थर्मास! डझनभर सुटकेसेस! डझनभर टीसेटस! काय दुकान काढायचंय? हां! आयडिया! नाहीतरी संसार म्हणजे काय? दुकानच की! पण अशा प्रेझेंटसपेक्षा कॅश देणं चांगलं!

**बीना** : ते बरं.

**सुधन** : पण कॅश कमी देतात!

**बीना** : आपल्याला काय कमी आहे!

**सुधन** : आपल्याला काय जास्ती आहे? तूच सांग. काय जास्ती आहे? तुला फक्त एक घर. मला फक्त एक घर. तुझ्याजवळ फक्त एक लाख रुपये आहेत. माझ्याजवळ फक्त एक लाख रुपये आहेत. काय जास्ती आहे? प्रेझेंटस जास्त पाहिजेतच. जास्त प्रेझेंटस मिळालीच पाहिजेत. अग पगारावरसुद्धा आता बोनस असतो. आठ पूर्णांक तेहेत्तीस शतांश! अन् लग्नातल्या प्रेझेंटसवर बोनस नको? कामगारांची किती सुखं पाहा. पगारचे पगार वर आणखी बोनस. मालकांना फक्त एक नफा. त्यातही कर कर कर. नोकरांना कामाचीसुद्धा चिंता नाही. मालकांना पैसा मोजण्याची चिंता, पैसा राखण्याची चिंता! नाही; ते काही नाही; बोनस–प्रेझेंटस मिळालीच पाहिजेत. आपण मोठा फलकच लावू या!

**बीना** : मी नाही असलं काही करणार! मी छापणार पत्रिकेवर 'प्रेझेंटस आणू

नका!' म्हणून 'कृपया.'

**सुधन** : मी नाही छापणार.

**बीना** : आमच्या पत्रिकेत आम्ही छापणार.

**सुधन** : तुमच्या लग्नात तू छाप. आमच्या लग्नात आम्ही नाही छापणार.

**बीना** : अहो तुमचं आमचं लग्न एकच आहे!

**सुधन** : हे बघ, मग आता तुझं अर्धं, माझं अर्धं. फिक्टी फिक्टी. तुझं म्हणणं, प्रेझेंटस आणू नका. तुझं म्हणणं म्हणजे नुसतं म्हणणंच हं! माझं म्हणणं, प्रेझेंटस आणा. दोन्हीही छापू या. नाहीतर दोन्हीही न छापू या. दोन्हीही सारखंच. तेव्हा छापलं नाही तरी अर्थ तोच. प्रेझेंटस पाहिजेत! प्रेझेंटस आणू नयेत म्हटल्यावर जर प्रेझेंटस आणायची चाल आहे तर न म्हटल्यावर तर आणलीच पाहिजेत!

**बीना** : अहो लोकांनी प्रेझेंटस आणण्याआधी आपण मला साड्या आणू या. नव्या, लग्नाच्या. चला ना गडे!

**सुधन** : अग लग्नात प्रेझेंटस मिळतीलच की.

**बीना** : अहो पण ती प्रेझेंटस घेण्यासाठी अंगावर नवी साडी नको का? उंची उंची प्रेझेंटस घ्यायची, मग अंगावर उंची साड्या नकोत का? जितकी उंची साडी तितकी उंची प्रेझेंटस!

**सुधन** : चल. चल, ताबडतोब चल. अगदी डोक्यापर्यंत उंच साडी आणू.

**बीना** : अहो, थांबा. निघालात कुठं? मी साडी नेसते!

**सुधन** : मी थांबू? तू साडी नेसतेस म्हणून मी थांबू? छान! अग मग हे काय आहे अंगावर?

**बीना** : अहो ही आतली.

**सुधन** : बाप रे! म्हणजे मी आतलीच कापडे पाहतो आहे काय?

**बीना** : अहो, आतली म्हणजे घरातली. बाहेरची वेगळी.

**सुधन** : बायकांचा असा आत बाहेर वेगळा प्रकार असतो वाटतं?

**बीना** : पुरुषांचं घराबाहेरच सगळं झकपक. आत काहीच नसतं!

**सुधन** : अग पुरुषांचंच आत खरं असतं-इथं, डोक्यात. तिथं बायकांच्यात काही नसतं!

**बीना** : मग हव्यात कशाला बायका?

**सुधन** : अग मग सोन्याचे दागिने घेऊन ठेवायचे कुठं?

**बीना** : म्हणजे बायको म्हणजे एक खुंटी?

**सुधन** : खुंटी नव्हे, तिजोरी, सोनं ठेवण्याची.

**बीना** : अहो, तुम्ही मला आज अंगठी आणणार होतात ना? लग्नाची? माझ्या नव्या नावाची?

**सुधन** : हो. विसरलोच.

**बीना** : अगबाई! कुठं?

**सुधन** : विसरलो म्हणजे तुला सांगायचं विसरलो. आणली आहे तर. सोन्याची गोष्ट मी विसरेन काय? मी? हं. ही घे. वाच नाव. सांग कसं वाटतं.

**बीना** : इश्श!

**सुधन** : काय इश्श?

**बीना** : नाही गडे तुम्हीच वाचा.

**सुधन** : आता तू एवढी शिकलेली–

**बीना** : नाही पण तुम्हीच वाचा.

**सुधन** : म्हणजे?

**बीना** : अहो नाव घ्या बायकोचं.

**सुधन** : अस्सं! अस्सं! छान! छान! नाव काय असेल, ओळख! तशी हज्जारो नावं आहेत ग. पण त्यांत काही अर्थ नाही. या जगात फक्त एकच गोष्ट सत्य आहे – सोनं. बाकी सर्व क्षणभंगुर. म्हणून सोन्याचं नाव ठेवलं आहे तुला. आता ओळख?

**बीना** : हेमांगिनी?

**सुधन** : छे. छे. हे नाव फारच काव्यमय वाटतं. हां. तसं गिनीवरून गिनी गोल्डची आठवण होते. पण तितकंच.

**बीना** : मग, कांचन?

**सुधन** : छे छे. कांचन म्हटलं की किंचन आठवतो. ही चणचण काही बरी नव्हे.

**बीना** : मग, सुवर्णा?

**सुधन** : शाब्बास? आता माझी बायको शोभतेस खरी. सुधन–सुवर्णा! तू माझी बायको झालीस. घे हे बक्षीस.

**बीना** : ऊं हुं (नुसता हात पुढे करून एक बोट वर करते. तो क्षणभर पाहत राहतो मग अंगठी घालतो.) शॉपिंगसाठी मी नवी साडी नेसून येते तोवर तुम्ही ही पत्रं वाचा अभिनंदनाची. तुमची पत्रं वाचून होताहेत तोवर मी येतेच हं! अच्छा! जाऊ?

**सुधन** : तू साडी नेसतेस आणि मी पत्रंच पाहू?

**बीना** : मग काय, मी पत्रंच पाहू आणि तुम्ही साडी नेस...! (हसत आत

जाते. दार बंद करते.)

**सुधन** : पत्रं! काय पाहायचं यांत! ठराविक साच्याचा मजकूर. अभिनंदन कसलं? रद्दी ही. पण रद्दी म्हणूनसुद्धा भाव यायचा नाही या चिटोऱ्यांना. उगीच सुवासिक कागद आणि रंगीबेरंगी लखोटे वापरतात हे मूर्ख लोक. जवळ जवळ शंभर पत्रं ही! म्हणजे शंभर रुपये नुसते वाया गेले. हेच जर यांनी आम्हांला रोख दिले असते तर व्याजी नसते का लागले? पण लक्षात कोण घेतो? ही रंगीबेरंगी फुलंपाखरांसारखी पत्रं बघवत नाहीत. पण ही दोन खाकी पत्रं कसली? बीनाच्या कामाची दिसतात. वाचावी का? का वाचू नये? मी आता बीनाचा नवरा झालोच आहे तनमनधनानं. (पत्रं वाचतो. वाचता वाचता कण्हू लागतो आणि मग –) सुवर्णा, सुवर्णा, बाहेर ये.

**बीना** : अहो आत्ताच मी आत आले. इतक्यात कशी बाहेर येऊ?

**सुधन** : जशी असशील तश्शी ये.

**बीना** : अहो कपडे बदलायचं अर्धंच झालंय.

**सुधन** : अर्धी ये.

**बीना** : कशी मी येऊ?

**सुधन** : तश्शी ये.

**बीना** : कशी मी येऊ?

**सुधन** : आधी ये.

**बीना** : कशी मी येऊ?

**सुधन** : धावत ये.

**बीना** : अहो मी कपडे काढलेत.

**सुधन** : आणि मी नागवला गेलोय.

**बीना** : अहो झालंय तरी काय?

**सुधन** : मी पुरता लुबाडला गेलोय.

**बीना** : अहो कुणी चोर का आला?

**सुधन** : तुझ्यात चोर शिरलाय!

**बीना** : बाई बाई बाई! काय मी करू?

**सुधन** : कोणाला सांगू?

**बीना** : कसं मी करू?

**सुधन** : अग आई आई आई आई आई...

**बीना** : अहो मारलं का चोरानं?

**सुधन** : ठार मेलो!

**बीना** : किती मेलात?

**सुधन** : पार बुडालो!

**बीना** : आटपलंच माझं.

**सुधन** : मी ही आटपलोच!

**बीना** : (धावत येत) इश्श! फुक्कट गेली सगळी काळजी माझी! तुम्ही तर चांगले धड आहात की!

**सुधन** : हे धडच आहे माझं! जीव नाही त्यात!

**बीना** : शुभमंगल म्हणायची वेळ आली आणि अमंगल काय बोलता हो?

**सुधन** : माझे आई, काय केलंस तू हे?

**बीना** : काय केलं?

**सुधन** : काय करायचं ठेवलंस? कलियुगात स्त्रीबुद्धी प्रलयाला गेली म्हणतात ते पटलं.

**बीना** : अहो पण असं काय कोणचं घोडं मारलंय मी?

**सुधन** : तू मला मारलंस! हे बघ, ही चांगली मास्तरणीची नोकरी चालत असलेली सुखासुखी सोडून दिलीस?

**बीना** : अहो आता तुम्ही होणार माझे स्वामी. मग दुसऱ्या कुणाची ताबेदारी मी कशाला पत्करू?

**सुधन** : अग पण मास्तरणीची नोकरी घालवलीस म्हणजे वर्षाला चार हजार रुपये, पंचवीस वर्षांचे लाख रुपये, त्याचं चक्रवाढ व्याज, त्याचं चक्रवाढ व्याज, त्याचं चक्रवाढ व्याज... सगळं सगळं फुक्कट घालवलंस की!

**बीना** : अहो दुसरे पुष्कळ चांगले उद्योग आहेत मला करण्याजोगे.

**सुधन** : अग पण धंद्यात पुढचं पाऊल पक्कं झाल्याखेरीज मागचं कसं उचललंस? आता तू आणि तुझ्याबरोबर मी – कोसळलो!

**बीना** : कोसळायला काय झालंय? एवढं तुमचं घर, तुमचे लाख रुपये, तुमचे धंदे...

**सुधन** : बरोब्बर! बरोब्बर! तू माझ्या पैशावर डोळा ठेव! कारण तुझं सगळं खटलं कोर्टात अडकलंय ना? हे वकिलाचं पत्र काय सांगतंय?

**बीना** : अहो ते माझेच हक्काचे पैसे आहेत. पण माझ्या नातेवाइकांनी उगीचंच कोर्टात नेलंय सारं प्रकरण.

**सुधन** : म्हणजे निकाल लागेपर्यंत काही फायदा नाही, आणि निकालच

लागला की सगळाच तोटा! निकालाची काय गॅरंटी? आणि कोर्ट फी, वकील फी, साक्षीदारांची फी... बापरे बापरे बापरे!

**बीना** : अहो, बोलूनचालून वडिलोपार्जित इस्टेट ती. आलिया भोगासी असावे सादर.

**सुधन** : पण तू हे सगळं मला आधी का नाही सांगितलंस?

**बीना** : तुम्ही ही पत्रं आधी का वाचलीत?

**सुधन** : आता हे लग्न करून काय फायदा?

**बीना** : फायद्यासाठी लग्न ठरवलंत?

**सुधन** : तू काय तोट्यासाठी लग्न करतेस?

**बीना** : तुमचा काय तोटा झाला हो?

**सुधन** : माझे लाख गेले म्हणजे त्याचे दोन लाख झाले असते ते गेले. त्याचे चार लाख झाले असते ते गेले. त्याचे आठ लाख गेले! बापरे! माझे असंख्य लाख गेले! केवढं नुकसान हे! डोकं बधिर झालंय. छातीवर दडपण येतंय.

**बीना** : अहो बसा, बसा, सरबत आणू का बर्फाचं?

**सुधन** : नको. नको. उगीच खर्च.

**बीना** : डॉक्टरांना बोलावू का? औषधानं बरं वाटेल.

**सुधन** : डॉक्टर नको, मुळीच नको. त्यांची व्हिजिट फी, त्यांची तपासण्याची फी, त्यांची औषधांची फी – नको – नको – नको.

**बीना** : मग बाहेर जाऊ या का? फिरायला? खरेदी करायची आहे ना लग्नाची?

**सुधन** : आता कसलं लग्न? आता हे विघ्न!

(तोंड फिरवून कपाळाला हात लावून बसतो. विरुद्ध दिशेला ती तशीच बसते.)

# प्रीती मिळेल का हो?

# २

**(हनीमून हॉटेल)**

**बीना** : त्यावेळी हे भांडले माझ्याशी मी नोकरी सोडून दिली म्हणून. पण 'तुमच्याशिवाय दुसऱ्या कुणाची नोकरी मी करणार नाही,' असं मी पुनः पुनः सांगितलं तेव्हा स्वारी शांत झाली अन् लग्नाला तयार झाली. लग्न तर झालं! हा माझ्या प्रेमाचाच विजय नव्हे का? आणि त्यांचंही माझ्यावर प्रेम आहे म्हणूनच ना त्यांनी माझा अपराध पोटात घातला? मी त्यांच्यावर प्रेम करते. ते माझ्यावर प्रेम करतात. या प्रेमातूनच माझी कला फुलू लागेल. मला आणखी काय पाहिजे? माझ्यावर प्रेम करणारे एवढे हे एवढ्या जवळ असल्यावर मला आणखी काय पाहिजे? आता आले म्हणजे सोडणारच नाही. धरून ठेवीन मुठीत. कुठं कुठं जाऊ देणार नाही. अस्सं धरून ठेवीन घट्ट घट्ट. पण ते आले म्हणजे ना! त्यांचा पत्ता कुठंय? केव्हा येणार कुणास ठाऊक. कुठं गेले असतील? लग्न झाल्यावर म्हणे पुरुषांची नजर दुसऱ्या बायकांवरच जास्त खिळते. असं काय जास्त असतं दुसऱ्यांच्या बायकांत कुणास ठाऊक? पुरुषांची जातच अशी. पण नाही; हे नेहमी इतर श्रीमंतांविषयी म्हणतात, ''बायकांचा करा नाद आणि व्हा बरबाद.'' हे नाही लागायचे दुसऱ्या कोणा मेलीच्या मागे! आणि मी बरी लागू देईन? दुसऱ्या कुणी यांच्या श्रीमंतीला भुलून यांना ओढण्याचा प्रयत्न केला तरी तिच्या तावडीतून ओढून आणीन मी यांना. माझे आहेत ते. माझे एकटीचे. सोडणार नाही. पण आहेत तरी कुठं? आम्ही आलो हवेत तरंगत, ढगांच्या पायघड्यांवरून चालत – विमानानं. सामान दिलं पाठवून रेल्वेनं. ते आणायला म्हणून ते गेले ते तिकडेच. अहो, या ना. या की लवकर. आलात म्हणजे बांधून ठेवणार आहे तुम्हाला माझ्या बाहुपाशांनी.

या ना.

(सुधन आणि हमाल सामानासह प्रवेश करतात.)

**सुधन** : हं. सामान ठेव आत. नीट रचून ठेव. हं. हे घे चार आणे. चल.

**हमाल** : चार आणे काय, मालक?

**सुधन** : अरे मग काय चार रुपये द्यायचे की काय?

**हमाल** : होय मालक.

**सुधन** : अरे नुसतं सामान स्टेशनवरून इथं आणलंस तर का चार रुपये? दोन आण्यांचं काम नाही. तुला दुप्पट पैसे दिले म्हणून तू आणखी मागू लागलास?

**हमाल** : मालक, सामान मी डोक्यावरून आणलं. माझी मान मोडून गेली.

**सुधन** : अरे तुझी मागणी ऐकून माझी तर कंबर मोडली.

**हमाल** : मालक, दया करा या गरिबावर.

**सुधन** : अरे तूच जरा नजर टाक या गरिबावर. अरे मी काय पैशाची खाण काढलीय?

**बीना** : देऊन टाका हो.

**सुधन** : तू इथे नको तोंड घालू.

**हमाल** : मालक, माझा वेळ घेऊ नका. चार पैसे आणखी मिळाले तर मिळवू द्या.

**सुधन** : अरे तूच माझा वेळ चोरतो आहेस. तुझ्यापेक्षा माझ्या वेळेचं मोल जास्त आहे.

**हमाल** : म्हणूनच मालक, चार पैसं द्या.

**सुधन** : अरे तू वाद घातलास म्हणून तूच मला दंड भरला पाहिजेस.

**हमाल** : मालक, कामाचे पैसे मागतोय.

**सुधन** : अरे, कसलं काम? नुसतं इकडचं सामान तिकडे ठेवायचं. त्याला लागतेय काही अक्कल का भांडवल?

**हमाल** : ती तुम्हा मोठ्या माणसांची कामं! म्हणूनच मालक, या छोट्या माणसावर खुशी करा. मालक, हे हनीमून हॉटेल. तुम्ही लग्नाची पहिली रात्र साजरी करायला आला.

**सुधन** : तू पण जा लवकर तुझी रात्र साजरी करायला.

**बीना** : असं काय हो? करा त्याला खूष.

**सुधन** : तू बायको माझी का त्याची?

**बीना** : अहो, काय बोलता हे?

**सुधन** : मग त्याची बाजू कशी घेतेस?
**बीना** : आज आपला आनंदाचा दिवस. त्यालापण आनंदी करा.
**सुधन** : अग जगाला आनंदी करायला गेलो तर आपल्याला दुःखी व्हावं लागेल.
**हमाल** : मालक, तुमचा वाद मिटेल असं दिसत नाही. ते चार आणेपण घ्या तुमची रात्र सजवायला. मी चाललो.
**सुधन** : खुशाल जा. तुझ्यासारख्या भांडखोरांना अशीच शिक्षा पाहिजे.
**बीना** : थांब रे. मी तुला बक्षीस देते.
**सुधन** : अग तू बक्षीस कुठून देणार? माझ्याच पैशांतून ना?
**बीना** : अहो पण मी तुमची बायको आहे ना?
**हमाल** : मालक, मी जातो.
**बीना** : थांब रे, मी पैसे देते.
**सुधन** : जा रे. मी नाही देत.
**बीना** : थांब.
**सुधन** : जा.

(इतक्यात 'थांबा, थांबा' असा गंभीर आवाज करीत शेजारच्या खोलीतून सुरेश ऊर्फ स्वामी सुवर्णानंद बाहेर येतात आणि 'श्रीराम जयराम जयराम' करीत दहा रुपयांची नोट हमालाला देतात.)

**सुरेश** : बेटा, जा. सुखी राहा. (हमाल जातो. स्वामी भजन म्हणतात.)

**रघुपति राघव राजाराम खुशाल साधा अपुले काम**
**पतितपावन सीताराम मिळवा कमवा पुष्कळ दाम**
**श्रीराम जयराम जयजयराम करा काम वा करा आराम**

**बीना** : स्वामीजी, क्षमा करा. आम्ही चुकलो. आपण गरिबावर दया केलीत.
**सुधन** : स्वामीजी, आपण थोर. आपण (आम्हा) गरिबांवर दया केलीत.
**बीना** : स्वामीजी, मी आपणांस वंदन करते.
**सुधन** : स्वामीजी, आपला लोभ आम्हा गरिबांवर असाच निरंतर असू द्या.
**बीना** : मी आपले पैसे आणून देते.
**सुधन** : अग, स्वामीजी थोर आहेत. ते द्रव्य घेणार नाहीत. सोनेरुपे त्यांना मृत्तिकेसमान!
**बीना** : स्वामीजी, आम्हाला लाजवू नका.
**सुधन** : अग, ते थोर संन्यासी. आपण साधेसुधे संसारी. द्रव्याचा आनंद आपल्याला. त्यांना ब्रह्मानंद! म्हणून तर त्यांनी द्रव्याचा त्याग केला.

**बीना** : (एकीकडे) अहो, तुम्हाला काही आहे का नाही? ते संन्यासी झाले म्हणून काय झालं? त्यांचे उपकार कशाला? फेडायला नकोत?

**सुधन** : संन्यासी तो संन्यासी. अन् लोकांच्या संसारात लुडबूड कशाला करतो?

**बीना** : त्यांनी औदार्य दाखवलं. आपणही दाखवलं पाहिजे.

**सुधन** : मुळीच नाही. त्यानं आगाऊपणा केला. त्यालाच भोगू दे.

**बीना** : मी नाही तुमचं ऐकणार.

**सुधन** : अग बोके संन्यासी तो. त्याचा डोळा तुझ्यावर. म्हणून पैसे दिलेन.

**सुरेश** : सुवर्णामाई, सुधनराव तुझे पतिदेव आहेत ना? त्यांचे ऐक.

**बीना** : स्वामीजी, आपल्याला आमची नावं कशी कळली?

**सुधन** : अग हॉटेलच्या रजिस्टरमध्ये पाहिली असतील.

**सुरेश** : बीनामाई, अंतर्ज्ञान झाल्यावर हॉटेलची रजिस्टरं कशाला पाहू?

**सुधन** : आता मात्र नवल वाटायला लागलंय. स्वामीजी, आपणाला हिचं पहिलं नाव माहीत आहे?

**सुरेश** : आपलाही सर्व इतिहास आम्हाला माहीत आहे. आपला लाख रुपये किंमतीचा फ्लॅट आहे. लाख रुपये आपण वडिलांकडून काढले आहेत. बीनाताई आपल्याच बरोबरीच्या. म्हणजे वयानं, गुणानं नव्हे; इस्टेटीनं ... म्हणूनच आपण त्यांच्याशी विवाह जुळविलात. पण त्यांची इस्टेट कोर्टात अडकली आहे.

**बीना** : स्वामीजी, आपल्याला सगळा इतिहास माहीत आहे?

**सुरेश** : सगळं भविष्यही माहीत आहे! आम्ही सर्वसाक्षी, त्रिकालज्ञानी...

**सुधन** : खरोखरच! एकच शंका विचारतो, आपण संन्याशी, आश्रमात राहायचे, ते या हनीमून हॉटेलमध्ये कसे?

**सुरेश** : तुमच्यावर प्रेम करायला! बेटा, तुम्ही लोक एकमेकांवर प्रेम करता. आम्ही सर्व लोकांवर प्रेम करतो. तुम्ही आपापल्याला संसारात लक्ष घालता. आम्ही सर्व जगाच्या संसारात लक्ष घालतो. तुम्ही लोक एकमेकांवर प्रेम करण्यात बुडून जाता. तुम्हांला आमची आठवणसुद्धा होत नाही. मग तुमच्यावर प्रेम करण्यासाठी हिमालय सोडून आम्ही हनीमून हॉटेलमध्ये उपस्थित होतो. तुमचं कल्याण तुम्हाला दिसत नाही ते तुमचं कल्याण आम्ही साधतो!

**सुधन** : स्वामीजी, आपण भविष्य ओळखता?

**सुरेश** : तंतोतंत ओळखतो. लग्नं, मुलंबाळं, द्रव्यलाभ...

**सुधन** : द्रव्यलाभ?

**सुरेश** : व्यवसायनोकरी, रेसलॉटरी, सोनंचांदी, जमीनजुमला...

**सुधन** : सर्व काही?

**सुरेश** : सर्व काही!

**सुधन** : आणि आपण लोकांचं कल्याण करता?

**सुरेश** : कोटकल्याण करतो.

**सुधन** : कोटींनी कल्याण करता?

**सुरेश** : होय, बेटा. कोट्याधीशसुद्धा करतो. नाहीतर लोकांचं भलं करणं याला काय अर्थ आहे? प्रपंची पाहिजे सुवर्णऽ! आणि बेटा, तुझी वाटचाल कोट्याधीश होण्याच्या दिशेनंच चालू आहे!

**सुधन** : खरंच, स्वामीजी?

**सुरेश** : लवकरच तू कोट्याधीश होणार. आज तर तू दहा लाख मिळवणार आहेस! आज तू लावशील तो लॉटरीचा नंबर, लावशील ते मटक्याचे आकडे, लावशील तो घोडा...

**सुधन** : स्वामीजी, स्वामीजी, आपण थोर आहात! माझं भाग्य आपली गाठ पडली!

**सुरेश** : माझं भाग्य आपली गाठ पडली!

**सुधन** : स्वामीजी, मी आपल्याला वंदन करतो आणि निघतो. असाच लोभ असू द्यावा या गरिबावर.

**सुरेश** : नीघ बेटा. लवकर नीघ. इच्छापूर्ती कर.

**बीना** : अहो, कुठं निघालात? आज आपली पहिली रात्र. मी एकटी कुठं बसू? आपल्या नशिबानं आपल्याला खूप मिळतंय. आणि नशिबात असेल तर आणखी मिळेलही. पण पैशामागे, त्यातही अशा बिनकामाच्या पैशामागे, कशाला धावायला हवं घोड्यासारखं? असेल आपली लक्ष्मी ती येईल आपल्या पायांनी चालत आपल्याकडे. आपण कशाला धावायला हवं तिच्यामागे वेड्यासारखं?

**सुधन** : तूच वेडी आहेस. दैव देतं आणि कर्म नेतं ते असं. तुला मी मागेच प्रत्यक्ष सिद्ध करून दाखवलं की एका लॉटरीत मी एक हजार जिंकले, पुढच्या लॉटरीत दहा हजार जिंकले, आणि आज फुटणाऱ्या लॉटरीत मी नक्की लाख रुपये जिंकणार आहे!

**सुरेश** : बेटा, तू भाग्यवान आहेस!

**सुधन** : बघ, स्वामींचीसुद्धा इच्छा आहे की मी लखपती व्हावं.

**बीना** : तुम्ही लखपती की सुवर्णापती?

**सुधन** : दोन्ही.

**बीना** : एक माणूस एकच पती असतो. सांगा, तुम्ही लखपती की सुवर्णापती?

**सुधन** : तू माझी पत्नी म्हणवतेस अन् माझ्या पतीला धक्का लावतेस?

**बीना** : तुम्ही माझे देव आहात, म्हणूनच आज तुम्हाला मी क्षणभरसुद्धा दूर होऊ देणार नाही.

**सुधन** : स्त्री ही पुरुषाच्या मार्गातली धोंड असते म्हणतात, ती अशी. मी बाहेर पडल्याशिवाय राहणार नाही.

**बीना** : ठीक आहे. पण जाण्यापूर्वी स्वामींचे पैसे देऊन जा आणि वर त्यांना चांगलं घसघशीत द्रव्यदानही द्या.

**सुधन** : बाहेर पैसे मिळाले की आल्यावर देईनच.

**बीना** : असे कसे हो अगदी तुम्ही? तुम्ही द्यायचेत ते पैसे स्वामींनी दिले. त्यांनी तुम्हाला द्रव्यलाभ सांगितला, अन् तुम्ही काय द्रव्यलाभ झाल्यावर त्यांना कमिशन देणार?

**सुधन** : अग मिशनचे दिवस गेले! हे युगच कमिशनचं आहे! दोन पार्ट्या जुळवून द्यायच्या फुकटात आणि दोन्हींकडूनही कमिशन काढायचं चढ्या भावात!

**बीना** : जा तुम्ही. मी देईन स्वामींना द्रव्यदान.

**सुधन** : किती देणार?

**सुरेश** : सुवर्णामाई, आम्ही द्रव्यदान घेत नाही.

**बीना** : मग?

**सुरेश** : आम्ही फक्त प्रेमदान घेतो! दुसरं कोणतंच दान घेत नाही.

**बीना** : मग आपले दिवस जातात कसे?

**सुरेश** : दिवस जातातच. **जो जो दिवस उगवला, तो तो त्याने घालवला!** त्याची काळजी त्याला!

**सुधन** : बघ बघ, स्वामीजी किती मोठे आहेत?

**बीना** : पण आपण त्यांचं नावसुद्धा विचारलं नाही, त्यांनी आपली सांगितली तरी.

**सुरेश** : सुवर्णामाई, या देहाला सुवर्णानंद म्हणतात.

**सुधन** : सुवर्णानंद?

**सुरेश** : होय, 'प्रपंची पाहिजे सुवर्णा,' हा आमचा संदेश.

**सुधन** : सुवर्णानंद महाराज की जय!

**बीना** : नाव सुवर्णानंद? आणि सोनं मिळविण्याचा उपदेश? असं कसं बाई उलटंच?

**सुरेश** : जागी हो, बेटी. हे कलियुग आहे. सत्ययुगात सर्वजण सत्यानं वागत होते. कलियुगात सर्वजण असत्यानं वागतात. कलियुगात धर्मही उलटा होतो. सत्ययुगात वेदधर्म, त्रेतायुगात पुराणधर्म, द्वापारयुगात इतिहासधर्म आणि कलियुगात अधर्म हाच धर्म!

**बीना** : अगबाई, म्हणजे?

**सुरेश** : घाबरू नको, बेटी. आमचा ग्रंथ तू वाचला नाहीस वाटते, 'द्रव्यप्राप्तीतून मोक्षप्राप्तीकडे?'

**बीना** : नाही.

**सुरेश** : मग ऐक. 'द्रव्यप्राप्तीतून मोक्षप्राप्तीकडे.' जितकी जास्त द्रव्यप्राप्ती तितकी मोक्षमार्गात प्रगती! ईश्वराचा पहिला गुण कोणता? ऐश्वर्य! ईश्वराजवळ ऐश्वर्य असतं. म्हणून ज्याच्याजवळ ऐश्वर्य असतं तो ईश्वरच असतो.

**सुधन** : ऐक. ऐक.

**सुरेश** : ज्याप्रमाणं शारीरिक शक्तीसाठी काय वाटेल ते खावं, त्याप्रमाणं ऐश्वर्यासाठी काय हवं ते करावं!

**बीना** : अगबाई!

**सुरेश** : फक्त देवाचं नाव मुखात कायम ठेवावं म्हणजे झालं! हल्ली हाच धर्म. याच धर्माचा प्रसार आता जोरात चालू आहे. पण अद्याप काही मूर्ख नास्तिक अधार्मिक लोक गतयुगातील मार्ग आचरून द्रव्यप्राप्तीकडे दुर्लक्ष करतात आणि मोक्षमार्गालाही मुकतात.

**बीना** : अग बाई! आपले गुरु तरी कोण?

**सुरेश** : जय गुरुमहाराज! आमच्या गुरुदेवांचं शुभनाम स्वामी लिंगानंदमहाराज! स्वामी लिंगानंदमहाराज की जय!

**बीना** : कोण? लिंगानंदमहाराज?

**सुरेश** : नव्हे! 'भगवान' लिंगानंद महाराज! आपण त्यांचा ग्रंथ वाचला नाही वाटतं 'कामवासनेतून रामोपासनेकडे?'

**बीना** : कामातून रामाकडे?

**सुरेश** : काम म्हणजेच राम!

**बीना** : भलतंच!

**सुरेश** : भलतंच नव्हे! राम हा एकपत्नी, एकवचनी, एकबाणी, एकनिष्ठ...

त्याच एकनिष्ठतेनं कामाची उपासना केली म्हणजे राम भेटतो. एकनिष्ठा म्हणजे एकाच व्यक्तीशी निष्ठा असा अर्थ नव्हे. कितीही स्त्री-पुरुषांशी संबंध आला तरी चालेल. फक्त एका कामवासनेशी मात्र अव्यभिचारी निष्ठा हवी! हा गुरुमंत्र जपा – ॐ ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हैं 'पुल्लिंग स्त्रीलिंग जय जय जय जय जय जय लिंग!' (नृत्य करतो आणि एकदम स्तब्ध होतो.)

**बीना** : म्हणजे काय होतं?

**सुरेश** : म्हणजे या योगसाधनेनं अंगात वीज निर्माण होते आणि तिचा प्रकाश सर्वत्र पडू लागतो. स्त्रीपुरुषसंबंधाचा काळ जितका जास्त लांबेल तितकी जास्त वीज निर्माण होईल. अहो, हे शास्त्रीय सत्य आहे!

**बीना** : ते कसं?

**सुरेश** : पुरुष धनप्राप्ती करतो म्हणून ते धनटोक आणि स्त्री ऋण करते म्हणून ते ऋण टोक. धन आणि ऋण टोके एकत्र आली की बॅटरी लागते की नाही? पेटली का बॅटरी?

**सुधन** : आँ? हो हो हो हो. शास्त्रीय ज्ञान आहे!

**सुरेश** : जेहत्ते कालाचे ठायी योगी लोक डोंगरीगुहांत का राहात?

**सुधन** : का?

**सुरेश** : गुहेत दिवसारात्री कितीही काळोख असो, कामयोगाची साधना सुरू केली की पाहिजे तितका प्रकाश!

**सुधन** : असं?

**सुरेश** : त्या प्रकाशातच बाकीचे शिष्य पोथ्या वाचीत, पोथ्या लिहीत, स्वयंपाकपाणी, खेळव्यायाम, पूजाअर्चा सर्व काही करीत!

**सुधन** : बाप रे!

**सुरेश** : अहो, पूर्वीच्या मंदिरांत आणि लेण्यांत संभोगदृश्ये का असत?

**सुधन** : का?

**सुरेश** : प्रकाश पडावा म्हणून!

**सुधन** : आपण पाहिलंत?

**सुरेश** : प्रत्यक्ष! आमचे स्वामी म्हणजे कामसूर्य. कसा लख्ख प्रकाश पाडतात! फ्लॅशलाइटशिवाय फोटो निघू शकेल.

**सुधन** : आणि आपण?

**सुरेश** : आम्ही त्याबाबतीत अमावास्येच्या चंद्राप्रमाणे आहोत.

**सुधन** : धन्य धन्य! स्वामी, पण या प्रकाशाचा बाकी जगाला काय उपयोग?

**सुरेश** : का बरं? सांप्रत वीजकपात का केली आहे?

**सुधन** : का?

**सुरेश** : आमच्या गुरूंच्या पंथाचा प्रकाश सर्वत्र फाकत चालला आहे म्हणून.

**सुधन** : त्यामुळेच हल्ली तरुण लोकांच्या खोल्यांतील दारेखिडक्या बंद असतात वाटतं!

**सुरेश** : अगदी बरोब्बर.

**सुधन** : पण या प्रकाशाचा समाजाला काय उपयोग?

**सुरेश** : आमचे स्वामी या कामयोगाचे सामूहिक प्रयोग करीत आहेत. ते सफल झाले की त्यांचा सार्वजनिक उपयोगही होईल. रस्त्यावर उंच उंच खांब, आणि लांब लांब तारा, आणि मोठे मोठे दिवे लावण्याऐवजी एकेक जोडपे उभे केले की झाले! वाटेल तेवढा प्रकाश! खुश्शाल सायकलीन् मोटारी लाइटशिवाय चालावाव्यात.

**सुधन** : पण जे रस्ते गावाबाहेर आहेत तिथं काय?

**सुरेश** : तिथं वाहनातून जाताना नेहमी जोडप्यानं जावं. सायकलवर रात्री डबलसीट एक तरुण आणि एक तरुणी असलीच पाहिजेत असा कायदाच करून टाकावा! तसेच इतर वाहनांचंही! जय अर्धनारी नटेश्वर!

**बीना** : पुष्कळ वाहवलो आपण. आता पुरे.

**सुरेश** : खरं आहे. आतापर्यंत तात्त्विक भाग झाला. आता प्रात्यक्षिक करा.

**सुधन** : पण स्वामीजी, पुरुष धन! धन जितकं जास्त तितका पुरुष शक्तिमान आणि आज आपण मला धनयोग सांगितला आहेत. असाच लोभ असू द्यावा गरिबावर. मी निघतो. (जातो.)

**बीना** : स्वामीजी, मी सामान्य स्त्री. आपण काय सांगितलंत मला कळलं नाही. पण आपल्याला भविष्य समजत असावं असं मला वाटतं. माझं भविष्य मला सांगाल?

**सुरेश** : सुवर्णा (ती वर पाहते) माई, कोणताही प्रश्न विचार. तुझ्या सर्व प्रश्नांची उत्तरे द्यायलाच ईश्वरानं मला पाठवलं आहे.

**बीना** : खरं?

**सुरेश** : होय, बीना माई. पण आपण देवाची आज्ञा ओळखत नाही. आपल्याला फक्त देवाज्ञा होते! तुझा देव तुझ्यापाशी आहे. तुझ्या अगदी जवळ आहे. तुझीच चिंता सतत वाहत आहे. पण ओळखणारी पाहिजे. काही लोक देवीला सोडून पैशाच्या मागे लागतात तर

काही लोक देवाला सोडून कलेच्या नादाला लागतात आणि स्वतःला फसवून घेतात. देवाशिवाय पैशाला काय किंवा कलेला काय, काय अर्थ आहे बरं?

**बीना** : स्वामीजी, आपण माझ्या मनातले विचार कसे जाणलेत?

**सुरेश** : तुझ्या मनातले विचार आम्ही केव्हाच ओळखले आहेत!

**बीना** : स्वामीजी, मग मला सांगा, मला खऱ्याखुऱ्या प्रीतीचा लाभ होईल का हो!

**सुरेश** : अवश्य होईल! अवश्य होईल! पण त्यासाठी तुझ्या अंतःकरणाच्या देव्हाऱ्यातल्या खऱ्या देवाचा शोध घे!

**बीना** : आणि माझ्या हातून कलेची खूपखूप सेवा घडेल का हो?

**सुरेश** : तुला खऱ्या प्रीतीचा लाभ होईल तेव्हा तुला खरी कलाही स्फुरेल, खूप खूप स्फुरेल.

**बीना** : माझे पतिदेव सुखी होतील का हो?

**सुरेश** : हो! त्यांना पैशात आनंद वाटतो. त्यांच्याकडे खूप पैसा आहे. पैशाकडे पैसा जातो. त्यांना खूपखूप पैसा मिळेल. ते खर्च काहीच करणार नाहीत. तेव्हा त्यांचं मुद्दल आणि व्याज, त्यांचं चक्रवाढ व्याज, त्यांचं चक्रवाढ व्याज, त्यांचं चक्रवाढ व्याज असं मारुतीच्या शेपटासारखं सारखं वाढतच जाईल आणि ते चक्रं पद्धतीने आनंदी होतील.

**बीना** : स्वामीजी, आपण थोर आहात.

**सुरेश** : बीना–माई, आपण एकच आहोत.

**बीना** : स्वामीजी, आपण प्रेममूर्ती आहात.

**सुरेश** : ही आपलीच कृपा!

**बीना** : स्वामीजी, आपल्याला मी काय देऊ?

**सुरेश** : प्रीती–शुद्ध प्रीती! माझ्यावर–नव्हे–तुझ्या अंतःकरणातल्या खऱ्या देवावर शुद्ध प्रीती कर म्हणजे मला ती पोचेल. खात्री बाळग. तुझ्यातला ईश्वर आणि माझ्यातला ईश्वर एकच आहे! प्रेममय परमेश्वर! जातो मी. कष्टी होऊ नकोस. तुला भेटलो, माझं अवतारकार्य संपलं. आता हा अवतार अंतर्धान पावणार! शोक करू नकोस. भगवान श्रीकृष्णांनी गीतेतच सांगितलंय ना, माणसानं आपली जुनी वस्त्रं बदलून टाकावीत. मी हे वस्त्र बदलायला जातो!

**बीना** : स्वामीजीऽ

**सुरेश** : वाईट वाटून घेऊ नकोस, कोमल बाले! अग ही खरोखरच आनंदाची गोष्ट आहे!

**बीना** : स्वामीजी, आपण किती महान आहात! आपण माझ्या अंतःकरणाला चटका लावलात आणि इथून कायमचे निघून चाललात!

**सुरेश** : होय. आता या अवतारात पुनः भेट नाही.

**बीना** : स्वामीजी ऽ ऽ

**सुरेश** : मुळीच शोक करू नकोस, मुली. झालं गेलं विसरून नव्याने जीवनाची वाटचाल करू लाग. नवे मार्ग शोध!

**बीना** : स्वामीजी ऽ ऽ

**सुरेश** : मी माझे हे जीर्णवस्त्र त्याग करून नवीन परिणायला जातो. तूही तुझी ही काही तास वापरल्याने, विमानाच्या प्रवासात चुरगळल्याने, जीर्णशीर्ण झालेली साडी सोडून टाक आणि अगदी नवीन काल संध्याकाळी घेतलेली लेटेस्ट फॅशनची खूप उंची साडी नेस. म्हणजे तुला आनंद होईल तसाच मलाही होईल.

**बीना** : स्वामीजी, आता आपली भेट–

**सुरेश** : दुसऱ्या अवतारात होईलही! ईश्वरी लीला अतर्क्य आहे! तू चिंतन करीत राहा! देव हा भक्ताचा पाठीराखा असतो. तो तुझ्या पाठीशी सतत उभा आहेच. आता मला जाऊ दे. मला सृष्टीचे बोलावणे आले आहे. ओ दिलीच पाहिजे. आलो! आलो! हा मुहूर्त टाळून चालणार नाही. मी जातो–जातो–जातो! (जातो.)

**बीना** : स्वामीजी गेले आणि माझ्या जीवाला असं एकाकी का बरं वाटू लागलं? माझ्या जीवनाची वाटचाल अशी एकाकीच का होणार आहे? पण स्वामीजी म्हणाले, यांना आज दहा लाख मिळतील आणि हे खूप खूप आनंदी होतील! आणि यांच्या आनंदातच माझाही आनंद नाही का? मग मला एकाकी वाटण्याचं काय कारण आहे? आणि स्वामीजी नाही का म्हणाले, 'तुला खऱ्या प्रीतीचा लाभ होईल आणि खरी कलाही स्फुरेल'? त्या प्रीतीची वाट मी पाहात आहे. अगबाई, किती उशीर झाला? आत्ता येतीलच की हे? तोपर्यंत मला साग्रसंगीत शृंगार करू दे. आज माझी पहिली रात्र ना?

(स्वतःची व खोलीची सजावट करते. फुले व दागिने घालते. अत्तराच्या बाटल्या काढून टेबलावर ठेवते. हे करीत असता गाते.)

मी नटले, सजले, फुलले मी

पण अशी कशी मी बावरले
नाव सुवर्णा माझे ठरले
मम जीवाचे सोने झाले
सुवर्ण पाहुनि हर्षित जरि मी
उरि काही तरी थरथरले
पुष्पचाप हे पुष्पबाण हे
पुष्पशस्त्र हे पुष्पअस्त्र हे
रतियुद्धाला सिद्ध जरी मी
कशी अचानक घाबरले

(गाणे संपताना सुधन येतो – ठोकळ्यासारखा खिन्न थंड.)

**बीना** : अहो, काय झालंय तुम्हाला? कुठं काही लागलंय का? का भुतानं झपाटलंय? का रागवलात माझ्यावर? अहो, बोला ना, बोला ना, बोला ना.

**सुधन** : माझे पैसे हरवले.

**बीना** : जाऊ देत हो. आपल्याला काय कमी आहे?

**सुधन** : माझे पैसे चोरीला गेले.

**बीना** : जाऊ देत हो. आपण कुठे फार पैसे बरोबर आणले होते?

**सुधन** : मी मेलो! ठार बुडालो!

**बीना** : अहो, पण झालं काय ते तरी सांगाल?

**सुधन** : अग, लॉटरीनं मला फसवलं. लॉटरीनं माझा विश्वासघात केला. मला एकही बक्षीस लागलं नाही! एकही बक्षीस मला मिळू नये? माझा प्रयत्न अचूक नव्हता का? मागल्या वेळी मी एक हजार जिंकले. गेल्या वेळी मी दहा हजार जिंकले. मग तूच सांग, यावेळी मला लाख रुपये मिळायला नको होते का? स्वामीजी तर म्हणाले की मला दहा लाख मिळतील! पण एकसुद्धा नाही? बाकी सगळ्या लोकांना सगळी बक्षिसं मिळाली. मग मला का नाही? का? असा काय मी गुन्हा केला होता? मी काय कुणाचं घोडं मारलं होतं? मी काय कुणाचा जीव घेतला होता? उलट मी तर सकाळ संध्याकाळ देवाची प्रार्थना करीत होतो की गरिबावर कृपा असू दे. पैसे मिळताच स्वामीजींनासुद्धा मी द्रव्यदान करणारच होतो! मग बाकी सगळ्यांना बक्षिसं मिळावीत; आणि मला एकट्यालाच का नाही? का? माझ्यात काही कमी आहे का? नाही, तूच सांग, माझ्यात काही कमी आहे

का? मला काही कळत नाही, का मला काही समजत नाही, का माझ्यात सगळे सद्गुण नाहीत, का मी पुण्यवान नाही? मग मलाच लॉटरी का लागू नये आणि इतरांना का लागावी? काय न्याय आहे हा? काय दैव आहे! काय कर्म आहे! एके ठिकाणी डोळे मिटून लॉटरी तिकिटांत हात घालून येतील ती तिकिटं घेतली. दुसऱ्या एके ठिकाणी गाय गोमाता दिसली, म्हणून तिला स्पर्श करून, तिचं मूत्र पडत होतं ते हातांत धरून, ते तोंडात घालून त्या ओल्या हातानं लॉटरीची तिकिटं घेतली. आता तूच सांग, गाय पवित्र नाही का? तूच सांग, गाय पवित्र नाही का? मग मला लॉटरीची तिकिटं का लाभली नाहीत? बाकी सगळ्यांना सगळी बक्षिसं लागली! मलाच का नाही? का? एके ठिकाणी तर एका भिकारणीनं पैसा मागितला. तिच्या कडेवर तान्हं पोर होतं. कुणाचं कुणास ठाऊक. पण पोर म्हणजे निष्पाप निरागस देवाची मूर्तीच नव्हे का? ती भिकारीण सारखी माझ्यामागं लागली. पोराला दूध नाही म्हणाली. तीन दिवस पोरगं उपाशी आहे म्हणाली. मला दया आली. मला फार फार वाईट वाटलं. मी थांबलो आणि तिला म्हटलं, 'देईन हं. तुला पैसा देईन हं. फक्त एक छोटं काम कर. छोटं मूल म्हणजे छोटा देवच. या मुलाच्या हातानं एक लॉटरीचं तिकिट मी घेतो आणि मला बक्षीस लागलं की तुला पैसे देतो.' पैशाच्या आशेनं ती भिकारीणसुद्धा कबूल झाली. मी तिकिटांचा गठ्ठा घेतला, आणि असा फर्रकन पिसला. त्या पोरानं जे तिकिट धरलं तेच बंदा रुपया देऊन विकत घेतलं. तरीसुद्धा मला बक्षीस मिळालं नाही? का दया आली नाही देवाला... त्या भिकारणीची आणि तिच्या पोराची? बाकी खूप खूप श्रीमंतांनासुद्धा बक्षिसं मिळाली! अन् मलाच गरिबाला का नाही? का? अग मुख्य बक्षीस पाच लाखांचं कुणाला मिळालं माहिती आहे? माहिती आहे? तुला कल्पनासुद्धा करता येणार नाही! अग त्या त्या त्या नालायक हमालाला! ही भलीमोठी पाटी घेऊन ओझं वाहणाऱ्या त्या बैलाला! तो काय करणार आहे त्या पैशाचं? त्याला का राखायला बंगला आहे? का उडवायला मोटार आहे? की खर्चायला प्रवास आहे? हनीमून हॉटेलमध्ये तो कधी राहणार आहे? की परदेशांत जाऊन तिथल्या बँका भरणार आहे? की शेअर घेणार आहे? की महागडे फ्लॅटस घेणार विकणार आहे? की चोरट्या

सोन्याची आयात करणार आहे? त्या गाढवाला यांतलं काय येणार आहे? त्याला चार पैसे कमवायची तरी अक्कल आहे का? त्याला काही खायला तरी मिळतंय का? मग त्याला काय करायचे आहेत लाख लाख रुपये? मला का नाही? का? गेल्या दोन वेळी फक्त काही हजारांची बक्षिसं मला मिळाली. बाकी पंचवीस वेळा माझे पैसे फुकट गेले! दरवेळी मी वाट पाहायची की यावेळी नक्की लाख रुपये मिळणार, पण दरवेळी मी लाख, लाख रुपयांचा त्याग करायचा! पंचवीस लाखांहून जास्त रुपयांचा मी त्याग केला! पण लोकांना त्याचं काही आहे का? कुणी माझा आदरसत्कार करतोय का? इन्कम टॅक्स ऑफिसर तरी काही सूट देतोय का? पंचवीस लाखांचा त्याग, थँकलेस त्याग! काय कष्ट पडतात जीवाला पैसे सोडताना, पण कुणाला त्याचं काही आहे का? हे पैसे जर मला मिळाले असते तर मी इतका सुंदर बंगला बांधला असता – जसा काही ताजमहाल! इतकी सुंदर मोटार गाडी घेतली असती, इतकी उंची दारू प्यालो असतो! अगदी आदर्श सभ्य गृहस्थ झालो असतो! पण सगळं एका क्षणात खलास! युद्धात काय भूकंपातसुद्धा इतका विनाश होत नाही! इतका विनाश झाला! आता काय करू? आता हे प्रचंड नुकसान भरून कसं काढू? आता मी काळा बाजार का करू नये? आता मी गोड्या तेलात विषारी तेल का मिसळू नये? आता मी जीव वाचवणारी औषधं मक्तेदारीनं घेऊन चढ्या भावानं का विकू नयेत? का?

**बीना** : अहो, जाऊ द्या ना. शांत व्हा. आहे त्यात समाधान मानू या आपण. सोडून द्या ते विचार.

**सुधन** : तुलाच सोडून द्यावंसं वाटतंय मला! मी इतके मागचे पुढचे विचार करतो आहे, पण तुला काय त्याचं? तू बायको आहेस की नाहीस माझी?

**बीना** : बायको आहे म्हणून तर...

**सुधन** : अग खऱ्या बायकोनं नवऱ्याला काय द्यायचं? हुंडा, नोकरी करून पगार, भावांकडून भाऊबीज. तुझ्याकडून मला काय आहे? तू मला फसवलंस. तुझी स्थावर जंगम इस्टेट कोर्टात गेली. तुझी नोकरी खड्ड्यांत गेली. तुला भाऊच नाहीत तर भाऊबीज कोठली? का नाहीत तुला पाच-सात श्रीमंत भाऊ? काय तुझा उपयोग? असली कसली तू बायको?

**बीना** : बायको बायको म्हणता पण अजून नवराबायकोसारखं राहिलो तरी आहोत का आपण? त्यासाठीच ना इथं आलो आपण?

**सुधन** : आता नवराबायकोसारखं राहायचं म्हणजे आणखीन काय करायचं?

**बीना** : एकमेकांवर प्रेम करायचं! एकमेकांशी समरस होऊन जायचं!

**सुधन** : मग होशील तू माझ्याशी समरस?

**बीना** : हो!

**सुधन** : घेशील मी करीन त्या व्यवहारात भाग? करशील मी सांगेन तो धंदा? पत्करशील मी सांगेन ती नोकरी?

**बीना** : हो हो हो!

**सुधन** : दे वचन!

**बीना** : हे घ्या.

(दोघे हात पुढे करून जवळ येतात. इतक्यात डोअर बेल वाजते. एक संभावित दिसणारा स्मग्लर दारात उभा – अर्थात सुरेश.)

**सुरेश** : माफ करा. माफ करा. मी भलत्या वेळी भलत्या स्थळी आलो. पण तसाच अत्यंत महत्त्वाचा बिझिनेस होता आपल्याकडे.

**सुधन** : अहो पण आपण कोण?

**सुरेश** : आपण शेठ सुधनराव. बडे बिझिनेसमन, शेअरबिअर, जमीनजुमला, सोनंचांदी यांचे खाऊक व्यापारी!

**सुधन** : हं हं हं! पण आपली तारीफ?

**सुरेश** : आपण थोर आहात; आधी आपण मला माफ करा. या हनीमून हॉटेलमध्ये ही आपली पहिली रात्र आणि मी मध्येच आडवा आलो. पण तसाच बिझिनेस...

**सुधन** : काही हरकत नाही. या हॉटेलचं नाव हनीमून हॉटेल असलं तरी आम्ही नो मून हॉटेल सारखेच राहत आहोत. या आत. बोला.

**सुरेश** : छे छे. आत बाईंना कशाला त्रास? आपण बाहेरच बोलू. लेडिजचा विचार आपण प्रथम केला पाहिजे. लेडिज फर्स्ट.

**सुधन** : छे छे. बिझिनेस फर्स्ट. या आत. (कॉटकडे बोट दाखवीत) बसा इथं. बसा, बसा, बसा.

**सुरेश** : पण मला संकोच वाटतो. आपण बाहेरच बसू. एक्सक्यूज मी, मादाम!

(दोघे बाहेर येतात.)

**सुरेश** : आपलं नाव आणि आपला बिझिनेस मी आपणांस सांगितलाच.

माझं नाव– पण आपण गुप्त ठेवणार?

**सुधन** : अगदी आपल्या खासगी कॅशबुकसारखं. पुढं बोला.

**सुरेश** : मी प्रेमचंद बीनावाला; मी आयात–निर्यात करतो. सोन्याचांदीची. खासगी रीतीनं. ही पाहा एक चीप. आपल्याला चीप मिळेल. अस्सल आहे?

**सुधन** : अस्सल आहे! (आपल्याच खिशात ठेवतो.)

**सुरेश** : आपण एकदम मोठ्या प्रमाणावर घेणार असाल तर आपल्याला लागेल तितका माल देऊ. आपण बडी पार्टी म्हणून आमच्या आंतरराष्ट्रीय विश्वात प्रसिद्ध आहात. यू हॅव इंटरनॅशनल स्टँडिंग, सर; म्हणून आपल्याकडेच आलो!

**सुधन** : ठीक आहे. घेऊ. पण भाव?

**सुरेश** : चालू बाजारभावाच्या निमपट!

**सुधन** : ठीक आहे. लाख रुपयांचा माल उचलू.

**सुरेश** : आपल्यासारख्यानं किमान पाच लाखांचा माल उचलला पाहिजे. आपल्याला एकदम दहा लाख मिळतील! दस लाख! यू विल बिकम ए मिल्योनायर, सर!

**सुधन** : जय स्वामी सुवर्णानंदजी! – ठीक आहे. पण आधी माल. मग पैसा.

**सुरेश** : बिलकूल ठीक. माल तयार आहे. जवळच आहे. आत्ताच समुद्रातून किनाऱ्याकडे येतो आहे. माझ्याकडे ट्रॅन्झिस्टर रेडिओ टेलिफोन आहे. हे ऐका सिग्नल्स. बोलायचं आहे? नाही. बोलाच. हॅलो स्कॉट... (हॅलो प्रेमचंद)... मीट मि. सुधनराव. अवर ऑनरेबल कस्टमर... (ग्लॅड टू मीट यु सर.)

**सुधन** : ग्लॅड टू मीट यू सर!... आश्चर्य आहे!

**सुरेश** : आम्हाला हे रोजचंच आहे! पण स्कॉटची बोट किनाऱ्याला लागण्यापूर्वी कस्टममधील लोकांना फक्त दहा हजार रुपये द्यायचे आहेत. तेवढी व्यवस्था...

**सुधन** : सॉरी. एवढी कॅश नाही जवळ.

**सुरेश** : चेकच द्या. हातावर काहीतरी टिकवल्याशी कारण.

**सुधन** : अहो पण तुमचा पत्ता?

**सुरेश** : तुमच्या ऑपोझिट खोलीत. तुमचं सोनं तुमच्या हवाली करून मगच जाणार. मध्यरात्रीच माल इथं येईल. लगेच द्यायचा का? नाही, आपण हनीमून हॉटेलमध्ये आहात म्हणून विचारतो!

**सुधन** : अहो तुम्ही आम्ही सारखेच. बिझिनेस फर्स्ट.

**सुरेश** : दॅट्स लाइक अ बिझिनेसमन! आपण आराम करा. बोट लागली की, माल आला की, मी उठवतोच आपल्याला. उठवू ना?

**सुधन** : बेलाशक. अच्छा! लवकर या हं. मी जागा आहे तुमच्यासाठीच!

**सुरेश** : अच्छा! नमस्कार! (जातो.)

**बीना** : झाला तुमचा बिझिनेस? इथं येऊनही दिवसरात्र बिझिनेस! मला कशाला आणलंत इथे?

**सुधन** : सोनं ठेवायला. तू माझी लक्ष्मी ना? पण मला पैसे मिळायला अन् तुला रुसून बसायला एकच मुहूर्त लागतो बघ.

**बीना** : आपलं मुहूर्तावर लग्न लागलंय हे तरी आठवतंय ना तुम्हाला?

**सुधन** : ती पार्ट्यांची अगडबंब बिलं बोचताहेत ना खिशाला माझ्या!

**बीना** : फेकून द्या ती बिलं, ते खिसे अन् ते कपडे. जरा पडा आता. दमला असाल पैशांची चिंता करून! या. डोकं, हातपाय चेपते.

**सुधन** : दमला असाल म्हणजे? दमलो आहेच. अखंड चिंता वाहून. चिंता करतो पैशाची! लग्न झालं म्हणजे खर्च दुप्पट वाढला. चेप. दुप्पट हातपाय चेप. बायकोचा तेवढाच एक उपयोग! पण आधी ही घे माझी बिलं. ठेव तिकडे पेटीत. तुझी कुठं आहेत?

**बीना** : माझी काय?

**सुधन** : बिलं? बिलं, बिलं?

**बीना** : माझी कसली बिलं?

**सुधन** : तू आज काय काय खर्च केलास? झोपण्यापूर्वी सगळा हिशेब नको का जमवायला?

**बीना** : झोपण्यापूर्वी स्वप्नात दंग व्हायची सवय आहे मला. बिलं बघायची नव्हे.

**सुधन** : मला स्वप्नं नकोत. मला सोनं पाहिजे. सांग. आज काय काय खर्च केलास?

**बीना** : फुलांचे हार खाते शंभर रुपये. सौंदर्यप्रसाधनं खाते दोनशे रुपये. अत्तरं आणि सुगंध खाते तीनशे रुपये...

**सुधन** : अग काय पैसे उडवलेस तू? माझी झोप उडाली! पहिल्या रात्री तू सहाशे रुपये उधळलेस? अशा किती रात्री जायच्या कुणास ठाऊक?

**बीना** : अहो, जरा पाहा तरी माझ्याकडे! तुमच्यासाठीच केलाय खर्च सगळा.

**सुधन** : तूच जरा पाहा माझ्याकडे! (खिसे उलटे करून दाखवतो.)

(ती त्याच्या जवळ येऊ लागते. इतक्यात बाहेरून सुरेश येऊन सिग्नल वाजवतो. तो एकदम उठून बाहेर पळून जातो.)

**सुधन** : काय बातमी?

**सुरेश** : बोट किनाऱ्याला चिकटली! सोनं लुटून घ्यायला सुरुवात झाली! थोड्याच वेळात तुम्ही सुवर्णमय होऊन जाणार!

**सुधन** : असं? मी जाऊ बाहेर बघायला?

**सुरेश** : कशाला? कशाला? तुम्ही आत जा. तुमचा खोळंबा नको. ट्रक आला की मी तुम्हाला उठवतोच. उठवू ना की सकाळी भेटू?

**सुधन** : नाही, नाही. उठवा, उठवा. मी तयारच आहे तुमच्याचसाठी.

**सुरेश** : ओके. मग जा आत. घ्या विश्रांती थोडा वेळ. (जातो.)

**सुधन** : (येत) चला. आजची रात्र सोन्याची झाली! अविस्मरणीय रात्र झाली! अशी रात्र पुन्हा यायची नाही! अरेरे! अशी रात्र हवी. रोजची रात्र अशीच येईल तर?

**बीना** : खरंच गडे, रोज रात्री असाच अचानक धनलाभ होईल, तर? पण मी सांगू का गडे, तुम्ही मनात आणाल तर रोज रात्री याहून मोठा आनंदलाभ नाही का होणार आपल्याला?

(ती त्याच्या शर्टच्या बटनाशी खेळू लागते. तो तिच्या हातातील सोन्याची पाटली धरतो. पाटली निरखून पाहतो.)

**सुधन** : बघ, बघ. सोन्याचा आनंद हाच जगातला सर्वश्रेष्ठ आनंद. तूच सांग, या सोन्याच्या पाटल्यांमुळंच तुझी मनगटं शोभून दिसतात की नाही? काय छान आहे हे सोनं! पण शंभर नंबरी आहे का? का चौदा कॅरट्स? का गिलीटच केलेलं आहे?

**बीना** : मला नाही ठाऊक.

**सुधन** : तुझी इस्टेट सगळी कोर्टात अडकलेली. खरे दागिने तू कुठून आणणार?

**बीना** : मलाही खोटी म्हणा. काय भोग आहे माझा!

**सुधन** : मी एवढा खऱ्याचा भोक्ता! पण काय भोग आहे माझा!

(बीना रागाने दागिने काढून फेकते. इतक्यात बेल वाजते.)

**सुधन** : बाप रे! चोरबीर तर नसेल? लपव, लपव ते दागिने.

**बीना** : अहो खोटेच आहेत ना ते? मग नेऊ द्या की चोराला.

**सुधन** : अग पण चोराला कुठं ठाऊक आहे ते खोटे आहेत म्हणून? (पुन्हा बेल वाजते.) हां. चोर नाही. ट्रक असणार सोन्याचा. (बाहेर येतो.)

**सुरेश** : माफ करा, मालक.

**सुधन** : माफीचं कारण नाही. यू आर वेलकम. चांगलं केलंत, आलात. या, या, या. कुठं आहे सोनं? कुठं आहे सोनं? कुठं आहे सोनं?

**सुरेश** : माफ करा. सोनं सुरक्षित आहे; पण पोलिसांच्या ताब्यात! तुम्हाला इशारा द्यायला आलो. तुमच्या सहीचा चेक पोलिसांनी पकडलाय. तुम्हालाही पकडतील. मलाही पकडतील. मी पळतो! (जातो.)

**सुधन** : मेलो! ठार बुडालो! (आत येऊन कॉटवर बेशुद्ध पडतो.)

**बीना** : अगबाई! आता काय करू? आता कुणाला हाक मारू?

**सुरेश** : (दारात येत) रडू नकोस, बीना. हा कांदा घे आणि लाव त्याच्या नाकाला.

(सुधन उठून बसतो. नाकावर कांदा! 'माझं सोनं? दहा लाख?' म्हणून पुन्हा पडतो. बीना घाबरून म्हणते, 'अग बाई!')

**सुरेश** : काही काळजीचं कारण नाही. येईल जरा वेळानं शुद्धीवर. पण पैशाच्या वेडातून त्याला या जन्मात शुद्ध येईल असं वाटत नाही. पैशासाठी हा सौदेबाज माणूस जीवसुद्धा टाकील!

**बीना** : (उठून रागाने पुढे येऊन त्याच्या थोबाडीत मारते. तो तिचा हात धरून ठेवतो.) हे मला दाखवून द्यायला तू ही सोंगं आणलीस? त्यांच्या जीवाशी खेळलास तू. त्यांचा जीव गेला असता म्हणजे मी तुला मिळाले असते, असं वाटलं होय तुला?

**सुरेश** : त्याचा की नाही जीव गेलाच होता तुझ्यातला. तो अडून राहिलाय तो आणखी पैशासाठी! आत्ता त्याच्या जिवात जीव येईल की दुप्पट वेगानं तो जीव टाकील पैशांसाठी.

**बीना** : पण तू माझ्यासाठी जीव टाकायचं थांबव. भुतासारखा मागं लागला आहेस माझ्या.

**सुरेश** : होय. मी भूत हे मम असे नच यात शंका! तुझ्या सौंदर्याच्या दीप्तीनं माझा जीव जळून गेलाय आणि हे भूतच उरलंय मागे.

**बीना** : ते भूत जाऊ दे नरकात. पुनः तोंड दाखवू नकोस मला. जा.

**सुरेश** : तुझ्या इच्छेखातर मी नरकातसुद्धा जाईन. कारण तुझ्या आठवणीनं मला तिथंसुद्धा स्वर्गसुखच लाभेल, बीना! पण तुला जशी आत्ता कोणाच्या तरी मदतीची गरज एकदम लागली तशी पुन्हा केव्हा लागली तर स्मरण कर माझं! मी ताबडतोब येईन; आणि आत्तासारखा मीच उपयोगी पडेन तुझ्या! मीच! (जातो.)

# प्रीती मिळेल का हो?

# ३

### प्रवेश पहिला

### सुधनचे घर

**बीना : (हातात बाहुला घेऊन)**
**लुटूलुटू चालत चुटूचुटू बोलत**
**राजा येइल माझा हासत**
**पाय चिमुकले रुणूझुणू वाळे**
**ओठ लालसर सतेज ओले**
**बिलगुनि मजला करील चाळे**
**आनंदे घर भरेल सगळे**
**वाट तयाची आहे पाहत**

दुसऱ्या कुणाची वाट पाहणार मी? यांची? यांना पैशापायी नाही क्षणाची फुरसत. घरात चांगले थोर पुरुषांचे फोटो लावले - शिवाजी-बुद्ध, गांधीजी-सावरकर; तर म्हणाले, ''कशाला लावलेस हे फोटो? आधी फोटोंचा खर्च आणि नंतर त्यांच्याकडे बघत बसलो म्हणजे वेळ वाया जाणार तो खर्च.' टाकले विकून सगळे फोटो-दुप्पट किंमतीला एका वेड्या स्वप्नाळू मुलाला. मी म्हटलं, ''पाहा, त्या महापुरुषांनी जगासाठी जीव दिले, लोक त्यांच्यासाठी जीव टाकतात, आणि आपण?'' तर म्हणतात, ''अग प्रत्येकजण स्वार्थी असतो. गांधीजींना बॅरिस्टरकीपेक्षा लीडरशीप फायद्याची वाटली म्हणून त्यांनी ती केली!'' कंटाळा आला म्हणून मी बागेत खूप फुलझाडं लावली - जाईजुई, चमेली, पारिजात, गुलबक्षी - तर म्हणाले, ''अग वेडी आहेस. फुलंच लावायची तर फक्त गुलाबच लाव. गुलाब फुलांचा राजा! खूपखूप गुलाब फुलू देत. गुलकंद तरी मिळेल!'' शेवटी बाग मोडून तिथं कोंबड्यांची खुराडी ठेवण्यात आली. अंड्यांचा पैसा, कोंबड्यांचा पैसा! मला नाही आवडत कोंबड्या. मी स्वस्थच

बसले. म्हणून माझ्यामागं सारखे लागलेत काही तरी मोठा उद्योग कर म्हणून. आता बरं झालं. आता चोवीस तास मला मोठा उद्योग मिळेल. अय्या! मोठा कसा? छोटा! इवलासा इवलासा! पिटकुला! पण त्यानं माझं सगळं मन व्यापून टाकलंय. हळूहळू तो माझं पोट व्यापून टाकील अन् मग बाहेर येऊन सगळं घरसुद्धा व्यापून टाकील अन् माझा आनंद सगळं आकाश व्यापून टाकील! छोटासा बालसूर्य आकाश नाही का रंगारंगांनी भारून टाकीत? कालपासून माझं पोट सारखं ढवळतंय. हे डॉक्टरांकडून औषध आणायलाच गेलेत. डॉक्टर मला तपासून गेले. त्यांच्याबरोबरच हे गेले. तास झाला. अजून आले कसे नाहीत? आल्यावर त्यांना ही बातमी कशी सांगू? त्यांना कसं वाटेल? खूपखूप आनंदच होईल, नाही? इतका खोऱ्यानं पैसा ओढताहेत हे, त्याला वारस हवा ना? पुरुषांना मुलगाच हवा असतो. पण बायकांनासुद्धा पहिला मुलगाच हवा असतो की! दुसरी मुलगी चालेल. तिसरं... अगबाई, पहिल्याचा पत्ता नाही अजून अन् मी तिसरीकडेच चालले. पण मुलगा असो, मुलगी असो, मूल झालं की नवरा बायको अगदी एकजीव होत असतील नाही? कधी येणार हे?

(बेल वाजते. ती दार उघडते. सुधन येतो.)

**सुधन** : हं, हे औषध.

**बीना** : आणखी काही बातमी?

**सुधन** : (हसून) हो. लवकरच आपल्या घरी...

**बीना** : एक नवं माणूस येणार आहे!

**सुधन** : तुला कसं कळलं?

**बीना** : मग काय कळल्याशिवाय राहील? आता ते माणूस आलं की हे घर कसं भरून जाईल, सजून जाईल, नटून थटून जाईल! माझं सोनं ते! सोन्याचं तेज फाकेल घरात सगळीकडे!

**सुधन** : अगदी बरोबर! घरात जिकडे तिकडे सोनंच सोनं होऊन जाईल! अगदी लखलखीत! लाखालाखाचं सोनं म्हणजे काय? सगळं घर सोन्याचं होऊन जाईल.

**बीना** : मग तुम्हाला पैशांच्यामागे पळण्याऐवजी त्या सोन्यामागे पळावं लागेल.

**सुधन** : अग पळेन ना! आपला जन्म कशासाठी आहे? पण तूही त्या सोन्याचं अगदी मनापासून स्वागत करशील ना?

**बीना** : इश्श! म्हणजे काय? आपल्या माणसाचं स्वागत आपण करणार नाही?

**सुधन** : शाब्बास! तू आत्ताच त्याला आपलं मानलंस! चांगलं केलंस!

**बीना** : हो बाई! मुलगा असो, मुलगी असो.

**सुधन** : नाही नाही. मुलगी नाही. मुलगाच आहे.

**बीना** : अय्या! तुम्हाला कसं कळलं? डॉक्टर म्हणाले?

**सुधन** : नाही. डॉक्टर 'काही नाही' म्हणाले. पण मला आपलं वाटतं मुलगाच असावा. कारण हल्ली तरुण मुलं मुलींसारखी दिसतात अन् मुली मुलांसारख्या दिसतात. पण तो मुलगाच असावा!

**बीना** : तुम्हाला मुलगाच हवा ना? सोन्यासारखा?

**सुधन** : होय ना. सोन्याचाच मुलगा हवा! दुसरा काय कामाचा?

**बीना** : माझं सोनं ते!

**सुधन** : अग बघशील! मूर्तिमंत सोनं आहे! सुवर्णतुला करील!

**बीना** : अय्या! तुम्ही सुवर्णतुला करणार? किती मोठे आहांत तुम्ही? बाकी ठीकच आहे. इतकं सोनं तुम्ही जमवलंत. इतकं दान करणार?

**सुधन** : अग हे दानाचं काय काढलंस? आपण दान द्यायचं नाही. दान घ्यायचं.

**बीना** : कुणाकडून?

**सुधन** : त्या येणाऱ्या माणसाकडून!

**बीना** : अहो कोण येणार आहे?

**सुधन** : आमचे एक मित्र. चित्रपटनिर्माता आहे. अग, खूप श्रीमंत आहे! आणि तरुणही आहे! शिवाय देखणाही आहे.

**बीना** : त्याचं काय काम आहे इथं?

**सुधन** : ते तुला पाहायला येणार आहेत!

**बीना** : काय?

**सुधन** : तसं त्यांनी तुला पाहिलंय. पण लांबून. लाँगशॉट. आज तुला ते जवळून पाहणार आहेत. क्लोज अप!

**बीना** : बाई!

**सुधन** : तू त्यांच्या नजरेत भरलीच आहेस, आणि तुलाही ते आवडतील!

**बीना** : माझ्या आवडीचा प्रश्न आहेच कुठं तुमच्या मनात?

**सुधन** : तेही खरंच आहे. कारण त्यांची पसंतीच महत्त्वाची आहे! तू जरा मेकअप कर ना!

**बीना** : काय?

**सुधन** : मेकअप! मेकअप! नाटक-सिनेमासाठी करतात तो. म्हणजे तुझं प्रथम प्रदर्शनीच ठसठशीत इंप्रेशन पडेल. तू मेकअप कर म्हणजे

आपण आपल्या पैशात लाखालाखांचा खड्डा पडला आहे तो मेकअप करू शकू.

**बीना** : काय बोलताहात तुम्ही हे?

**सुधन** : अग तुला ते प्रपोजल देणार आहेत.

**बीना** : काय?

**सुधन** : काँट्रॅक्ट! काँट्रॅक्ट?

**बीना** : काँट्रॅक्ट?

**सुधन** : सिनेमाचं. दहा लाखांची ऑफर आहे त्यांची. मी खूप खटपट केली, खूप लटपट केली, आणि त्यांना दहा लाखाला तयार केलं. पहिल्या फिल्ममध्ये तू त्यांच्या मनाजोगतं काम केलंस की ते दहा फिल्मसचं काँट्रॅक्ट करणार आहेत! दहा लाख दहांदा! म्हणजे एक कोटी! बघ, आपण एकदम कोट्याधीश बनून जाऊ. एकदम आपण सुसंस्कृत–कल्चर्ड–बनून जाऊ! एकदम आपण समाजाच्या खालच्या जातीतून सर्वांत वरच्या जातीत जाऊ! अग, हल्ली जाती कोणत्या? सगळ्यांत श्रेष्ठ कोट्याधीश! त्यांच्या खालोखाल लक्षाधीश! त्यांच्या खालोखाल हजारवाले! आणि बिनपैसेवाले सगळे गुलाम! सुवर्ण म्हणजे श्रेष्ठ वर्ण! बघ, आपण सर्वांत श्रेष्ठ वर्णात जाऊ!

**बीना** : आणि त्यासाठी मी सिनेमात जाऊ?

**सुधन** : अग तोच रुपेरी मार्ग आहे! त्याच रुपेरी पायघड्यांवरून तू चालत जा. मी तुझ्यामागं येतो.

**बीना** : मी तुमची धर्मपत्नी, आणि तुम्ही मला सिनेमात लोटता?

**सुधन** : अग सिनेमात; मसणात नव्हे!

**बीना** : तेच ते!

**सुधन** : तेच तेच. सिनेमात न जाशील तर मसणात जावंच लागेल.

**बीना** : असेल नशिबात ते होईल! पण मी नाही आपल्या पायांनी चालत सिनेमात जाणार!

**सुधन** : नाही तर तुझ्या सौंदर्याचा काय उपयोग?

**बीना** : तुमच्या असल्या प्रेमाचा मला काय उपयोग?

**सुधन** : अग तू एवढं कलाप्रेम कलाप्रेम म्हणून नाचतेस मग जरा सिनेमासारख्या कलेवर प्रेम कर.

**बीना** : प्रेम मला बहुधा सिनेमातल्या पडद्यावरच करावं लागणार!

**सुधन** : अग तेच खरं. त्या प्रेमामुळं रोज दिवाळी करता येते. काव्यातल्या

प्रेमानं रोज दिवाळं निघतं.

**बीना** : मी प्रेम तुमच्यावर करू की सिनेमातल्या माणसावर करू?

**सुधन** : दोघांवर कर. नाहीतरी बायकांचं सगळंच दुहेरी असतं. माहेर सासर. दोन घरं. दोन नावं.

**बीना** : पण अंतःकरण एकच असतं.

**सुधन** : त्यालाही दोन कप्पे असतात.

**बीना** : मला खरंच माहेरी जावंसं वाटू लागलंय.

**सुधन** : आहे काय तुझ्या माहेरी? सगळी इस्टेट कोर्टात अडकलीय!

**बीना** : काय करू मी?

**सुधन** : सरळ सिनेमात जा. अग तुझ्या घरात सिनेमा चालून येतोय.

**बीना** : माझ्या घरात मी सिनेमा करू?

**सुधन** : हे सीन तू करतेच आहेस ना? हे बघ. बायका बायकांचा मत्सर करतात म्हणून तू लक्ष्मीचा मत्सर करू नकोस. ते येण्याची वेळ जवळ आली आहे. येणाऱ्या लक्ष्मीला लाथाडू नकोस.

**बीना** : सिनेमातली लक्ष्मी म्हणजे काळा पैसा.

**सुधन** : अग पैसा नेहमीच पवित्र असतो – गंगेच्या पाण्यासारखा.

**बीना** : म्हणून मी अपवित्र होऊ? (रडू लागते.)

**सुधन** : हे नाटक करतेच आहेस ना? मग सिनेमा कर.

**बीना** : अहो नाटक जगापुढं घडतं. सिनेमा जगामागं घडतो.

**सुधन** : अग दृष्टिआड ते सृष्टिआड. मला वाद नको. मला पैसा पाहिजे.

**बीना** : माझा पैसा?

**सुधन** : तू नाव कुणाचं लावलं आहेस? तुझं नाव काय? तुझं नाव काय?

(इतक्यात बेल वाजते. सुधन दार उघडतो.)

**सुरेश** : (येत) माझं नाव रतिलाल मनसुखलाल.

**सुधन** : हं हं. माफ करा हं. आपलं नाव नाही विचारलं मी. आपलं नाव लवकरच जिकडे तिकडे रुपेरी पडद्यांवर झळकणार आहे!

**सुरेश** : येस. एकाच वेळी एक्झॅक्टली शंभर पडद्यांवर!

**सुधन** : शंभर?

**सुरेश** : वन हंड्रेड नेट. आणि माझ्याबरोबरच बाईंचंही नाव जोडीनं झळकणार आहे.

**सुधन** : ती सुभाग्यवती आहे!

**सुरेश** : मी आलो तेव्हा आपण बाईंना नाव विचारीत होतात. काय नाव बरं

बाईंचं? आपण सांगितलं होतं. पण शेकडो बायकांची नावं डोक्यात सारखी घोळत असल्यानं असा घोटाळा होतो! अं-मिस-

**सुधन** : सुवर्णा! पण 'मिस' नव्हे...

**सुरेश** : सॉरी हं. सिनेमातल्या सगळ्या बायका आम्हांला 'मिस'च वाटतात. वुइ 'मिस' देम. मीनाखुमारी, मधुभाला, गीताबाली, नूतन... सिनेमात गेलं की बायकांची वयं एकदम कमीच होतात! बाईंचं वय... विचारीत नाही मी. ते कमी होईलच. पण नाव काय ठेवायचं? मला वाटतं, आपण मगाशी हीच चर्चा करीत होतात? मी बाहेरून ऐकलं – 'तुझं नाव काय?'

**सुधन** : येस बॉस, आपण अगदी अचूक ओळखलंत! काय बुद्धी आहे आपली.

**सुरेश** : बुद्धी? अहो बुद्दू आहे मी! नवीन नाव सुचतच नाही मला. तुम्ही यांच्याविषयी सांगितल्यापासून मी यांचाच विचार करतो आहे तरीसुद्धा! इतकी नावं याद येताहेत! पण एकही ठरत नाही. पण सिनेमात नावं ठेवलीच पाहिजेत. सिनेमा म्हणजे बायकांचं मरण आणि पुनर्जन्मच! काही तरी नूतन नाव पहिजे. नवरत्ना, नवांगना, नवोढा...

(बीना तोंड फिरवते.)

**सुरेश** : बाई काहीच बोलत नाहीत? चुकलो. सिनेमात 'बाई' नसते. तमाशात, बाई. सिनेमात, देवी! देवीजी, आप खामोष क्यू? कुछ हुक्म फर्माईये!

**सुधन** : अं... ती लाजली आहे!

**सुरेश** : काय सुंदर पोज आहे! अँगल चांगला आहे! आत्ता त्यांना टिपायला हवं...

**सुधन** : आं?

**सुरेश** : कॅमेऱ्यानं, हो! आमची दृष्टी नेहमी कॅमेऱ्याचीच असते पाहा.

**सुधन** : बरोबरच आहे!

**सुरेश** : पण बाईंची टेस्ट घेतली पाहिजे. म्हणजे स्क्रीनटेस्ट, आवाजाची टेस्ट, वगैरे वगैरे...

**सुधन** : हो हो. घ्या ना. सगळी टेस्ट घ्या.

**सुरेश** : थँक्यू फॉर युअर अन्‌बिलिव्हेबल कोऑपरेशन! पण बाईंनीही दिलं पाहिजे-कोऑपरेशन – सहकार्य! अहो सहकार हा तर नवयुगाचा मंत्र आहे. जो सहकार देतो त्याचा उद्धार होतो. जितका सहकार

तितका उद्धार! जास्तीत जास्त सहकार तर जास्तीत जास्त उद्धार! तुम्ही मला सहकार द्या. मी तुमचा उद्धार करीन.

**सुधन** : खरोखरच तुम्ही आमचा उद्धार करताहात! केवढं भाग्य आमचं! आणि हे आमचं भाग्य आपल्या पायांनी चालत आमच्या घरी आलं! आमच्या घराचा, बेचाळीस पिढ्यांचा उद्धार झाला! लालसाहेब, हजार हजार धन्यवाद! लालसाहेब, माझ्या पुढ्यात ही लाजते आहे. तुमच्या पुढ्यात ही नाही लाजणार. ती आता बोलत नाही आहे. पण एकदा बोलू लागली ना म्हणजे अखंड बडबडते. नाही म्हणजे तशी चांगली बोलते. तसंच आता ही अवघडून बसली आहे ना, पण एकदा मोकळेपणानं वागू लागली की भयंकर मोकळेपणानं वागते. नाही म्हणजे तशी चांगली वागते. आता तुम्ही पाहालच. मी थांबतो बाहेर. दुसरी कामं करतो. मला तुमच्या या विषयातलं काही कळत नाही. तुमचं चालू द्या. फक्त काँट्रॅक्ट करताना मात्र मला कॉन्टॅक्ट करायला विसरू नका म्हणजे झालं! दहा लाखाला छदाम कमी नाही! एकावर सहा पूज्ये! सहा... सहा... (जातो.)

**सुरेश** : देवीजी, आपण बोलत का नाही? ही तर आपली पहिली मुलाखात! आपण नाराज का? जरा मुस्कुराइये! अहो, तुम्ही थंडच? सिनेमात कसं, हुकूम केला की लाजायचं, हुकूम केला की रडायचं. सगळं काम कसं हुकुमी पाहिजे. सिनेमाचा निर्माता – जसा मी – असतो हुकूमशहा. त्याच्या तालावर सगळ्यांनी नाचलंच पाहिजे! तुम्हाला येतं ना नाचायला? तुमचे हे तर सांगत होते की तुम्हाला सगळं काही येतं म्हणून! झक्क आहे! पण जरा झलक तर दाखवाल? हल्लीच्या न्यू वेव्ह सिनेमांत काय असतं पाहिलं आहेत ना तुम्ही – कॅबरे डान्स, बेडरूम सीन्स आणि मग बलात्कार!

**बीना** : बंद करा, बंद करा ही बडबड आणि जा निघून – मला बरं नाही वाटत आहे. मला ताप आलाय.

**सुरेश** : पाहू?

**बीना** : नको नको. मला स्वस्थ पडू द्या. जा तुम्ही.

**सुरेश** : (दारू पिण्याचा अभिनय करीत) नर्व्हस नका होऊ, देवीजी. सगळ्यांचंच असं होतं सुरुवातीला. पहिला घोट जरा कडू लागतो, जळजळीत लागतो, पण नंतर तोच हवाहवासा वाटू लागतो! आणि माणूस घटाघटा पिऊ लागतं – बाईसुद्धा. मलासुद्धा सुरुवातीला फार

भीती वाटायची! आता हसू येतं, पण मी उगीचच घाबरायचो! आता सवय झालीय. अगदी अंगवळणी पडलंय सारं! आता मला सर्वज्ञान झालं आहे. प्रत्येक केस मी नाजूकपणे हाताळतो!

**बीना** : दूर व्हा. दूर व्हा. मला नाही सिनेमात काम करायचं.

**सुरेश** : पण तुझ्या नवऱ्याला करायचंय ना!

**बीना** : मग त्यांनाच घेऊन जा. मी नाही बोलत तुमच्याशी शब्दसुद्धा. तुम्ही जा!

**सुरेश** : कुठं जाऊ?

**बीना** : बाहेर.

**सुरेश** : कसा जाऊ?

**बीना** : दारातून.

**सुरेश** : दार बंद आहे, बाहेरून. तसंच ठरलंय आमचं. कबूल केलंय त्यानं.

**बीना** : रामा, शिवा, गोविंदा!

**सुरेश** : रामाशिवागोंविदा! कुणाला हाका मारते आहेस?

**बीना** : गड्यांना?

**सुरेश** : नवऱ्याला हाका मारण्याऐवजी गड्यांना हाका मारतेस तू या वेळी?

**बीना** : रामा!

**सुरेश** : उगीच रामाच्या नावानं ओरडू नकोस. सगळ्या गड्यांना रजा दिलीय तुझ्या नवऱ्यानं! तुझ्या घरात आता आहोत फक्त तू आणि मी! दोन तास दिले आहेत तुझ्या नवऱ्यानं! दहा लाख हवेत ना त्याला? तुझी बेडरूम कुठे आहे? कुठं पळून जाऊ नकोस. उगीचच लपंडाव खेळू नकोस. आणि उगीच झाशीच्या राणीचा आवही आणू नकोस. मी पुरुष आहे, तू अबला. मी नर आहे, तू –

**बीना** : बाई बाई बाई! आता काय करू? कुठं जाऊ? कशी जाऊ?

**सुरेश** : माझेच प्रश्न तू विचारते आहेस ना, मग माझंच उत्तर ऐक. चल, नाच सुरू कर. तासभर नृत्य. तासभर कृत्य. चल, ये. वन्–टू–थ्री (नाच करू लागतो. तिच्या भोवती इंग्रजी मिश्र प्रकाराचा नाच करून तिला भिववतो. ती जास्तच घाबरते.) मार हाक कुणाला मारतेस ती. वाटेल तेवढ्या हाका मार. तू मला काही मारू शकत नाहीस. मी हुकूमशहा आहे! तुझ्यासारख्या अनेकजणी मी पाहिल्या आहेत! हाः हाः हाः! कुणाला हाका मारणार? नवऱ्याला? हाः हाः हाः! गड्यांना? हाः हाः हाः! देवांना? हाः हाः हाः!

(पुनः पुनः पितो, झिंगतो, कोचावर पडतो, उठण्याचा प्रयत्न करतो.)

**बीना** : सुरेश, सुरेश, तू म्हणाला होतास की मदतीची गरज लागली तर स्मरण कर माझं, मी येईन! पण तुला कशी हाक मारू? तुला कशी ऐकू येईल हाक माझी? अन् तू कसं सोडवशील मला! सुरेश, मी फसले रे, मी फसले. तुझ्याशीच लग्न केलं असतं तर असला प्रसंग कशाला ओढवला असता माझ्यावर? सुरेश, मी चुकले रे! सुरेश, सुरेश...

**सुरेश** : (प्रगट होत) आलो! बीना, रडू नकोस.

**बीना** : पुनः तू माझ्यामागे आलास, सुरेश? का?

**सुरेश** : अग, आत्ता तूच हाका मारल्यास ना मला? 'सुरेश, मी चुकले रे, मी फसले रे...'

**बीना** : तुझी ही कृष्णकारस्थानं तू बंद करणार आहेस की नाहीस?

**सुरेश** : काय म्हणालीस? कृष्णकारस्थान? म्हणजे मी तुझा कृष्ण? कन्हैय्या? आणि तू?

**बीना** : ठग आहेस तू. मला फसवायला आला आहेस.

**सुरेश** : अग त्यानं फसवलं तुला.

**बीना** : तू त्यांना फसवलंस.

**सुरेश** : तूच फसवते आहेस – स्वतःला.

**बीना** : तूच फसवून पकडलं आहेस मला. पण मी तुला अशी सापडेन होय?

**सुरेश** : का नाही? पकडू शकेन मी तुला. पण मी तुला सोडवायला आलोय.

**बीना** : जखम करून वर फुंकर मारण्याचं सोंग करतो आहेस तू.

**सुरेश** : अग हा तुझ्या कुंकवाचा–नव्हे, पैशाचा धनी खरोखरच एका पैसेवाल्या सिनेमानिर्मात्याच्या शोधात होता. भक्त जसा देवासाठी दाही दिशा धुंडतो ना, तसा हा पैसेवाल्यांच्या मागं लागला होता. म्हणून मी हे सोंग घेऊन तुला जागवायला आलो. माझा हा सोंगाड्या तुला चालला नाही! पण ज्याचं सोंग मी आणलं तो पैसेवालाच तुला चालेल?

**बीना** : खरंच का रे?

**सुरेश** : पाहायचंय तुला? पाहा – (सिनेमानिर्मात्याचे सोंग.)

**बीना** : नको, सुरेश. मी काय करू रे?

**सुरेश** : काही करू नकोस. बीना, तू मुक्त आहेस. माझ्या सुंदर मयूरा, तू फुलव तुझा पिसारा, तू नाच कर खरा! लाभला तर पाहीन मी जरा

आणि निघून जाईन घरा! पण हा मोर काय अशा पिंजऱ्यात पडावा? आणि या मोराच्या मांसावर वाटेल त्यानं ताव मारावा? मला नाही पाहवणार हे. माझ्या डोळ्यांदेखत होऊ देणार नाही मी ते. मग मी असाच मधे पडणार – आणि खात राहाणार तुझ्याच शब्दांचा मार!

**बीना** : सुरेश, मी गोंधळले आहे रे.

**सुरेश** : अग हा गोंधळ गोड आहे. पहाटेपूर्वी पक्षी चिवचिवाट करतात ना तो आहे हा. लवकरच सूर्य उगवणार!

**बीना** : माझ्या सूर्या, माझ्या डोक्यात प्रकाश पडला रे, पण...

**सुरेश** : त्याच्या डोक्यात फक्त पैसा आहे. पैशानं ठासून भरलंय ते. तिथं दुसरा कसलाही प्रकाश पडू शकणार नाही. अंधार, अंधार आहे तिथं सारा.

**बीना** : मला अंधाराची भीती वाटते रे.

**सुरेश** : आणि प्रकाशाची प्रीती वाटते ना? मग चल प्रकाशाकडे. प्रकाशाकडे ओढलं जाणं हा धर्म आहे तुझा, बीना. तू प्रकाशावर जीव कुरबान करणारच. दिवाभीताच्या संगतीनं अंधारात किती काळ राहणार तू? किती दिवस गेले आतापर्यंत तुझे असे? दिवस गेले का ग? गप्प का? रागवू नकोस. पण खरं सांगू तुला? अग ज्याच्या डोक्यात रात्रंदिवस फक्त पैसाच आहे ना त्याचा फक्त पैसाच वाढणार! मुलं वाढायला हवी असतील तर मुलांचा विचार करावा लागतो. निदान तेवढ्यासाठी तरी बायकोचा विचार करावा लागतो मनापासून, बाकी सर्व काही विसरून!

**बीना** : सुरेश!

**सुरेश** : असं मी नाही म्हणत. डॉक्टर म्हणतात. मला काही अनुभव नाही हो!

**बीना** : मग घे की अनुभव.

**सुरेश** : अग ज्ञान मिळवणं आपल्या हातात असतं. अनुभव मिळणं नशिबात असतं. आमचं नशिबच असं एकाकी! आमचे डोळे तुमच्याकडे तर तुमचे डोळे भलतीकडे! मग अनुभव कसा मिळावा? तूच सांग, हा अनुभव एकट्याला कसा मिळावा! एकट्याला जे अनुभव येतात ना, ते...

**बीना** : मीसुद्धा एकटीच आहे रे सुरेश–लग्न होऊनसुद्धा.

**सुरेश** : चांगलं आहे! अग जगात जे एकेकटे जगू शकतात ना तेच

एकमेवाद्वितीयही ठरू शकतात!

**बीना** : म्हणजे? एकेकट्या लोकांनी एकेकटंच राहावं? त्यांनी एकत्र येऊ नये?

**सुरेश** : अग असे जे एकमेवाद्वितीय ठरतात ना त्यांचीच खरी युती होऊ शकते!

**बीना** : सुरेश

**सुरेश** : बीना

**बीना** : सुरेश

**सुरेश** : बीना

**बीना** : सुरेश

**सुरेश** : थांब, बीना. मला जाऊ दे.

**बीना** : मलापण येऊ दे.

**सुरेश** : नको नको. मला एकट्यालाच जाऊ दे.

**बीना** : मग माझ्या मागे मागे कशाला आलास?

**सुरेश** : तुला बरोबर न्यायला नव्हे. तुला संकटातून सोडवायला. तू सुटलीस. मी सुटलो.

**बीना** : मी नाही राहणार आता इथं. दुसरीकडे कुठेही राहीन.

**सुरेश** : कुठेही राहा.

**बीना** : काय?

**सुरेश** : कुठेही राहा पण सुखी राहा.

**बीना** : तू दुःखी होऊ नकोस.

**सुरेश** : अग तू दुःखी झालीस तर मला दुःखी व्हावंच लागेल! जसं आता झालं! म्हणून म्हणतो, तू सुखी राहा; म्हणजे मी सुखी होईन.

**बीना** : माझ्याबरोबर येणार नससील तर माझ्या सुखदुःखाची तुला कशाला काळजी?

**सुरेश** : अग मी तुझ्याबरोबरच येणार. पण तुझ्याबरोबर म्हणजे तुझ्या सभोवती सभोवती. चंद्र फिरतो ना पृथ्वीभोवती गरगर गरगर तसं. पृथ्वी चालली की चंद्रही चाललाच!

**बीना** : अरे पण आता चंद्र आणि पृथ्वी जोडली गेली आहेत ना?

**सुरेश** : मग काय, तू माझ्यावर अग्निबाण सोडणार? बायकांच्या कटाक्षात अग्नी असतोच. तुझ्या या नयनबाणांनी तू माझ्यावर वर्षाव करणार?

**बीना** : माझा जीव माझ्या डोळ्यांत गोळा झाला आहे रे!

**सुरेश** : थांब बीना. तू माझी प्रिय मैत्रीण आहेस. पण नवऱ्याची बायकोही आहेस.

**बीना** : पूर्वी तू माझ्यावर प्रेम करीत होतास.

**सुरेश** : तू कुमारिका होतीस तेव्हा. प्रत्येक कुमारिकेवर प्रेम करणं हा प्रत्येक तरुणाचा –

**बीना** : जन्मसिद्ध हक्क आहे!

**सुरेश** : जन्मसिद्ध कसा असेल? तारुण्यसिद्ध हक्क आहे! – पण बायकोवर प्रेम करणे हे प्रत्येक नवऱ्याचे लग्नसिद्ध कर्तव्य आहे! आणि कर्तव्य हे नेहमीच दयामाया न ठेवता कठोरपणे करायचे असते. म्हणूनच सर्व नवरे आपल्या बायकांबाबत कर्तव्यतत्पर असतात! आणि त्या कर्तव्यात नवऱ्याला हातभार लावणे हेच इतरांचे कर्तव्य आहे. आणि तेच मी करणार आहे.

**बीना** : किती कठोरपणे वागतो आहेस तू? पक्का पुरुष आहेस.

**सुरेश** : तू कच्ची स्त्री आहेस!

**बीना** : तू या घरात मला पुनः डांबणार? पैशासाठी गुलाम म्हणून मला विकायला निघालेल्याच्याच दारात पुनः बांधणार?

**सुरेश** : मी पाठवलं नाही तुला या घरात. दख्खनची राणी तू! आपल्याच ऐटीत गेलीस चुकीच्या लाईनवरून धोक्याची घंटा मी वाजवीत असतानासुद्धा.

**बीना** : मी चुकले, चुकले, चुकले.

**सुरेश** : आणखी नवी चूक करू नकोस. केलीस तीच सुधार.

**बीना** : मी या कोंडवाड्यात राहू?

**सुरेश** : नकोच. तू घराबाहेर पडच.

**बीना** : घराबाहेर जाऊ आणि घर कसं सुधारू?

**सुरेश** : अग, घर मोडकळीला आलं की तात्पुरतं दुसरीकडे जावं लागतं आणि ते दुरुस्त करून घ्यावं लागतं.

**बीना** : हे घर मी दुरुस्त करू? यांना सुधारू? मला शक्य नाही हे. तुला तरी शक्य आहे का?

**सुरेश** : मलाही शक्य नाही हे.

**बीना** : या जगात कुणाला तरी शक्य आहे का हे?

**सुरेश** : या जगात दुसऱ्या कुणालाही शक्य नाही हे!

**बीना** : झालं तर मग!

**सुरेश** : बीना, दुसऱ्या कोणालाही शक्य नाही पण कदाचित त्याचं त्यालाच शक्य आहे! जगातल्या सगळ्या सुधारणा आतूनच व्हाव्या लागतात. त्या बाहेरून लादता येत नाहीत.

**बीना** : तू काय म्हणतोस तरी काय? त्यांच्यात काही बदल होईल असं मला वाटत नाही. त्यांना पैशाचं नुसतं वेड लागलंय आणि ते वाढतच जाणार आहे.

**सुरेश** : अगदी खरं आहे. पैशाची ओढ असावी पण वेड नसावं. आणि त्याला पैशाचं वेडच आहे कळू लागल्यापासून. पण बायको घराबाहेर पडल्यानं त्याला विजेचा धक्का बसेल आणि कदाचित त्याचं वेड जाईलही! तू एवढा धक्का दे म्हणजे झालं!

**बीना** : मला त्यांच्याजवळ जायचीसुद्धा आता किळस येते. त्यांच्याकडे बघायलासुद्धा नको वाटतं. त्यांच्या आठवणीनंसुद्धा अंगावर शहारा येतो माझ्या.

(तो तिच्या अंगावर एक सुरवंट टाकतो. ती 'ई ई' करते.)

**सुरेश** : अगदी सुरवंटासारखा आहे ना तुझा नवरा? पण तू घराबाहेर पडल्यानं जर तो विचारात पडला तर कदाचित त्याचं फुलपाखरू होईलसुद्धा अन् येईल उडत उडत तुला शोधत!

**बीना** : तूच जा उडत! मला आता कुण्णी कुण्णी नको आहे! मी आणि माझी कला! मी चालले!

**सुरेश** : थांब. दार बंद आहे. कपाळमोक्ष होईल तुझा.

**बीना** : सुटेन.

**सुरेश** : सुटणार नाहीस. हॉस्पिटलमध्ये पडशील. आणि या नराचा नर्स होईल.

**बीना** : यांच्या हृदयासारखंच दार आहे – कुलूपबंद.

**सुरेश** : धीर धर. प्रार्थना कर. आत्मबल जागृत कर म्हणजे कुलूप उघडेल!

**क्षणभर उघड दार नवऱ्या**
**तूझी पत्नी तीचा प्रियकर**
**गेले दमुनी ये ये लवकर!**
**लाज तुला ना लाज अम्हा पण येसी किती उशिरा?**
**अम्हा सोडुनी एका ठायी**
**लागलास तू पैशापायी**
**पूज्ये बँकबुकी वाढविता पूज्य जाहला खरा!**

(दार उघडते. सुरेश, बीना जाऊ लागतात. सुधन दार आडवतो.)

**सुधन** : व्हेरी गुड! फार छान! तुम्ही बरोबर निघालात. म्हणजे तुमचं जमलं. द्या टाळी. पण सारं काही रीतसर शिस्तीत झालं पाहिजे. काँट्रॅक्ट कुठं आहे? (पेन उघडून सहीला तयार होतो.)

**सुरेश** : तुमच्या लग्नाचं काँट्रॅक्ट कुठं आहे?

**सुधन** : ते तोंडी होतं. लेखी कुठं आहे?

**बीना** : माझ्या लेखी आपलं लग्न मोडलं आहे. मी निघाले.

**सुधन** : पण मी घटस्फोट देणार नाही. माझं दहा लाखांचं नुकसान, दहा वेळा दहा लाख म्हणजे कोटीचं नुकसान. त्याचं चक्रवाढ व्याज...

**बीना** : तुम्हाला कोटी रुपये देण्यासाठी मी सिनेमानटी बनू?

**सुधन** : अग जन्माला आल्यापासून मरेपर्यंत स्त्री ही पुरुषांसाठी नटतच असते. स्त्री ही क्षणाची पत्नी, नऊ महिन्यांची माता, आणि अनंतकाळची नटीच असते!

**सुरेश** : अहो पण मीही सिनेमानिर्माता नाही!

**सुधन** : मग आहात कोण तुम्ही?

**सुरेश** : माणूस!

**सुधन** : श्रीमंत की भिकारी?

**सुरेश** : माणूस!

**सुधन** : म्हणजे भिकारीच. तुम्ही खोटं बोलणारच.

**बीना** : सुरेश, बाहेर हो. मलाही बाहेर पडू दे!

**सुधन** : तुझ्यावर आतापर्यंत खर्च झाला तो तरी बाहेर पडू दे!

**बीना** : पाठवा नोटीस.

**सुधन** : करीनच फिर्याद तुम्हा दोघांवर. खोटं बोलतात. मला फसवलंत. मला खड्ड्यात पाडलंत. माझी नटी पळवलीत. माझे कोटी रुपये पळवलेत. नुकसानभरपाईचा दावा लावीन. सगळे पैसे वसूल करीन. घटस्फोट घेणाऱ्या बायका पोटगीसाठी कोर्टात जातात. मग मिळवत्या बायकोच्या नवऱ्यानं पोटगी का मागू नये? समान हक्क काय फक्त बायकांनाच? पुरुषांना नकोत?

**सुरेश** : ठीक आहे. मग भेटू या कोर्टात.

**सुधन** : पण मी घटस्फोट का म्हणून द्यावा? देणारच नाही. कोर्टात जाईन, रस्त्यात जाई, जगात जाईन आणि बायकोला परत आणीनच आणीन. माझी बायको माझी बायको आहे. सावित्रीनं सत्यवानाला यमाकडून

परत आणलं तसं मी माझ्या पत्नीला कुणाकडूनही परत आणीन. हिंदू स्त्री ही पतीची जन्मोजन्मी पत्नी असते. जन्मोजन्मी ती त्याला पैसा मिळवून देत असते. भारतीय संस्कृतीचा विजय असो! पुनर्जन्मावर सर्वांचा विश्वास बसो! वास्तविक गेल्या जन्मीचंच माझं देणं ही लागत असणार. म्हणून तर माझ्या कपाळी ही बायको आली. अग, पळून काय जातेस? कुठं फेडशील हे पाप? जगातलं पुण्य कमी होत चाललं. अशानं जग लयाला जाईल. भारतीय संस्कृतीमधली एक पत्नी आपल्या पतीला त्याच्या प्रेयसीकडे घेऊन जात असे. मी स्वतः तुला सिनेमात घेऊन चाललो होतो. आणि तू माझ्यावरतीच संतापतेस? स्त्रियांना हिंदू पुरुष घरात कोंडून घालीत म्हणून तुम्ही नावं ठेवता. अहो, मी स्वतः माझ्या धर्मपत्नीला घराबाहेर पडायला प्रोत्साहन देत आहे, मग मला नावं का ठेवता? फुल्यांनी स्त्रियांना जीवन दिलं. आगरकरांनी स्त्रियांना स्वातंत्र्य दिलं. कर्व्यांनी स्त्रियांना शिक्षण दिलं. मी स्त्रियांना सिनेमा देत आहे! पण माझी क्रांती तू कृतीत आणीत नाहीत. तुला त्याच्याबरोबर जायचंय ना? जा! खुश्शाल जा!! पण आपलं लग्न कशाला मोडतेस? तुला मी सर्व तऱ्हेचं स्वातंत्र्य देतो! माझ्याइतका उदार नवरा तुला कोणी मिळेल का? सर्व नवरे अगदी संकुचित मनोवृत्तीचे असतात. आता तू त्याच्या गळ्यात पडलीच आहेस ना? मग मी तरी दुसरं काय सांगत होतो? अग तू कुठेही जा. काहीही कर. फक्त, मला पैसे दे म्हणजे झालं!

**बीना** : मी पैशासाठी नाही आहे बाहेर जात. माझा हा देह पैशासाठी नाही आहे.

**सुधन** : अग सगळेच देह पैशातूनच उत्पन्न होतात! पैशासाठीच जगतात आणि पैशासाठीच मरतात.

**सुरेश** : आम्ही बहुधा पैशाशिवायच मरू.

**सुधन** : अहो मरू नका. पैसे खा आणि जगा.

**बीना** : तुम्ही जगा. आम्ही जातो.

(बीना, सुरेश जातात.)

**सुधन** : माझे पैसे द्या! माझे पैसे द्या! माझे पैसे द्या! गेले! गेले! गेले! माझे पैसे गेले! आता वसूल केले पाहिजेत! प्रत्येक व्यवहारात किमान दसपट फायदा झाला पाहिजे. पण हा आमच्या लग्नाचा व्यवहार तर

आतबट्ट्याचाच झाला! बाकी सर्व व्यवहारांत तोटा झाला की दिवाळं काढता येतं. लग्नाचं दिवाळं कसं काढणार? (चिंताग्रस्त बसतो.)

(सुरेश वकील बनून येतो.)

**सुरेश** : हॅलो मि. सुधनशेठ! मी बॅरिस्टर सत्यव्रत खोटे.

**सुधन** : कोण?

**सुरेश** : सत्यव्रत खोटे! आपला कायदेशीर मित्र. आपली कायदेशीर बायको एका बेकायदेशीर इसमाबरोबर पळून गेली आहे काय?

**सुधन** : होय. पण तुम्हाला कसं कळलं हे?

**सुरेश** : माझे वकील मित्र श्री. पोटे यांच्याकडे ते दोघे आता घटस्फोटाचा अर्ज लिहीत आहेत. घटस्फोटाला तुम्ही राजी आहात काय?

**सुधन** : नाही, रुपयात पैसुद्धा नाही.

**सुरेश** : मग तुम्हीच त्यांच्यावर फिर्याद करा.

**सुधन** : मी त्याच्यावर श्रद्धा टाकली; मी त्याच्यावर बायको टाकली; आणि त्यानं ती लांबवून टाकली.

**सुरेश** : तुम्हीच त्या दोघांना एकत्र अडकवलंत ना?

**सुधन** : हो. ना. पण त्याचा गैरफायदा त्यांनी असा घ्यावा ना? मीच त्यांची मैत्री जुळवून दिली, आणि त्यांनी माझीच मैत्री तोडली. काय कृतघ्न जग आहे!

**सुरेश** : तुमची बायको सज्ञान आहे ना? मग आपण काय करणार?

**सुधन** : मग तुम्ही वकील कसले? कायद्याला बगल देतो तो वकील. आमचे कर चुकविणारे वकील पाहा बरं.

**सुरेश** : मग मी काय हात हालवीत जाणार आहे वाटतं? अहो, तुम्ही तुमच्या बायकोला आणि मित्राला एकत्र अडकवून ठेवलंत ना? मग केस करा की माझ्या बायकोला माझ्या मित्रानं एकान्तात गाठलं, मी त्यांना पकडून ठेवलं. आपण साक्षीदार देऊ.

**सुधन** : आयडिया!

**सुरेश** : ठीक आहे. तुम्हाला अब्रू होती. पण तुमच्या मित्रानं ती घालवली. मग तुमच्या अब्रूची किंमत किती करायची? तशी नुकसानभरपाई मागता येईल. सांगा तुमच्या अब्रूची किंमत.

**सुधन** : लाख रुपये, नाही दहा लाख रुपये, नाही कोटी रुपये.

**सुरेश** : अगदी अब्रू लिलावात काढल्यागत बोलताहात?

**सुधन** : हो. बायको त्यानं पळवली नसती तर तिच्या बळावर मी कोटी रुपये मिळवलेच असते.

**सुरेश** : पण काय हो, तुम्ही कोटी रुपयांचा दावा लावणार पण त्यांच्याकडून ते वसूल होतील का?

**सुधन** : तो तर भणंग भिकारी आहे. ती पैसे मिळवू शकेल. पण तीपण त्याच्याबरोबर भिकारीण होणार आहे.

**सुरेश** : काही हरकत नाही. त्या दोघांना तुरुंगाची हवा खायला पाठवू. तुमची अब्रू तरी साफ होईल. हं. काढा वकील फी तासाला हजार रुपये. दहा साक्षीदारांची फी दहा हजार रुपये. कोर्ट स्टँप फी पंचवीस हजार रुपये. शिवाय वरखर्च.

**सुधन** : अहो, एवढा खर्च करून फायदा काय?

**सुरेश** : तुमची अब्रू साफ होईल.

**सुधन** : नुसती अब्रू साफ करण्यासाठी पन्नास हजार रुपये? त्यापेक्षा अब्रू गेलेली काय वाईट?

**सुरेश** : अहो तुमची बायको गेली म्हणजे तुमची अब्रू गेली.

**सुधन** : अहो ती नेसत्या वस्त्रानिशी गेली पण तुमच्या म्हणण्याप्रमाणं वागायचं तर पन्नास हजारांची रक्कम गेलीच.

**सुरेश** : नको तर राहिलं. पण या सल्ल्याबद्दल माझी फी द्या म्हणजे झालं. मग मी पण गेलोच. मला येऊन अर्धा तास झाला! पाचशे रुपये! एक मिनिट झालं, पाचशे वीस रुपये. दोन मिनिटं, पाचशेचाळीस. तीन मिनिटं, पाचशेसाठ. चार मिनिटं...

**सुधन** : अहो तुमच्या हातांत घड्याळ आहे की मीटर?

**सुरेश** : पाचशेऐंशी रुपये. तुमचे पन्नास हजार रुपये मी वाचवले.

**सुधन** : अहो माझे कोटी रुपये गेले त्याचं काय?

**सुरेश** : सहाशे रुपये!

**सुधन** : माझी पैशांची चालती बोलती बँक गेली. त्या दरोडेखोरानं लांबवली. ती तुम्ही आणून देत नाही. नुकसानभरपाई करून देत नाही. मग तुम्हाला मी पैसे काय म्हणून द्यावेत?

**सुरेश** : सहाशेसाठ रुपये!

**सुधन** : परमेश्वरा, बायको नको पण वकील आवर!

**सुरेश** : मला पण तुमचे पैसे नकोत. मला मिळालं हवं ते उत्तर!

**सुधन** : अहो तुम्हाला हवं ते मी तुम्हाला दिलं ना? मग त्याचा मोबदला

मला द्या ना. वकिलसाहेब, माझी फी द्या ना! (सुरेश जातो.) गेले! माझे पैसे गेले! मेलो! ठार बुडालो! (तिजोरीजवळ जात) माझी बायको... माझी तिजोरी. माझी बायको... माझी तिजोरी. पण बायकोपेक्षा तिजोरीच बरी. बायका हल्ली आखूड कपडे घालून दागिने उघडे पाडतात आणि चोरांना आवाहन करतात. पण तिजोरी चोरांना आव्हान देते. बायकांची अंगं कोमल, मऊ, लुसलुशीत असतात म्हणे! साफ खोटं! कारण बायकांच्या अंगावरचं सोनं दहावीस वर्षांत झिजून जातं! पण तिजोरीतलं सोनं अगदी जसंच्या तसं राहतं! बायकोच्या तोंडाला कुलूप कधीच घालता येत नाही! तिजोरी मात्र कायम कुलुपात असते! अहाहा! काय सुंदर आहे ही तिजोरी! काय तिचा आकार! काय तिचा रंग! काय तिचा स्पर्श! आणि तिजोरीचं अंतरंग कसं खरोखरीच संपन्न, समृद्ध, श्रीमंत आहे! नाहीतर बायकोचं काळकुट्ट अंतरंग – प्रेमानं भरलेलं, कलेनं माखलेलं! छे छे! परमेश्वरानं बायकांना जन्माला का घातलं? कुणास ठाऊक! बहुधा परमेश्वरसुद्धा आपल्या ऐश्वर्याच्या आत्मानंदातच मग्न असावा – माझ्यासारखा! म्हणून तर स्वर्गातल्या अप्सरा श्रीमंत देवांना सोडून पृथ्वीवरच्या भिकार माणसांच्या पुढे नाचतात! ती ऊर्वशी – लागली पुरूरव्याच्या मागे! ती मेनका – लागली विश्वामित्राच्या मागे! आणि ही बीना – लागली त्या भिकार तरुणाच्या मागे!... परमेश्वरा, बायकांना क्षमा कर, आपण काय करतो हे त्यांना कळत नाही!

(सुरेश गुंडाच्या भूमिकेत येतो.)

**सुरेश** : राम राम, मालक!

**सुधन** : अहो, कोण तुम्ही?

**सुरेश** : मी, रामूदादा.

**सुधन** : तुम्ही करता काय?

**सुरेश** : खून.

**सुधन** : काय?

**सुरेश** : काही नाही, खून...

**सुधन** : अहो कशाबद्दल?

**सुरेश** : पैशाबद्दल, अपमाणाबद्दल, किंवा सरळ सुपारी घेऊन.

**सुधन** : तुम्ही कुणाला मारणार? मला?

**सुरेश** : मालक, तुमाला मारलं तर आमचं कसं चालणार वं? तुमी शिरीमंत

शेठ आमचं धनी. तुमी आसामनी काम द्यायचं. तुमचा धंदा जोरात चालला म्हंजी आमचा धंदा बी जोरात चालंल. कसं?

**सुधन** : पण माझ्याकडे कसलं काम?

**सुरेश** : तुमची बायको तुमचं पैसे घेऊनशानी पळून गेलीय नव्हं? ती ज्या सोद्याबरुबर पळाली त्यानं तुमचा अपमाण केला नव्हं?

**सुधन** : हो ना. प्रचंड अपमान केला आणि त्याहून प्रचंड नुकसान केलं.

**सुरेश** : त्याची भरपाई मी त्यासनी कराया लावतो.

**सुधन** : पैशानं?

**सुरेश** : अवं पैशानं कसली मालक? हाय काय तेच्याजवळ?... रगतानं...

**सुधन** : ठीक आहे. ठीक आहे. पैसे बुडविणाऱ्यांना शिक्षा झालीच पाहिजे. माझी बायको पळाली आणि त्या चोरट्यानं पळवली. त्यांना कायद्यानं शिक्षा करणं फार महाग पडतं. पण करावं तसं भरावं. कर म्हणावं भरपाई रक्तानं.

**सुरेश** : तुमाला अपमाणाचा राग येतो. नव्हं का?

**सुधन** : तर काय? जीव पणाला लावून सूड घ्यावा असं वाटतं.

**सुरेश** : मग द्या तर सुपारी, आणि मी सांगतो ती रक्कम भी आगाव द्या.

**सुधन** : म्हणजे? हे दैवी काम तुम्ही क्षुद्र पैसे घेऊन करता?

**सुरेश** : क्षुद्र पैसे घेत नाही.

**सुधन** : छान! छान! थोर आहात!

**सुरेश** : थोर पैसे घेतो!

**सुधन** : किती?

**सुरेश** : आवं जसा इसम तशी रक्कम!

**सुधन** : किती?

**सुरेश** : फकस्त पंचवीस हजार रुपये.

**सुधन** : त्या चोर इसमाची किंमत पंचवीस हजार रुपये?

**सुरेश** : त्या चोर इसमाची नव्हं, तुमच्यासारख्या थोर इसमाची किंमत.

**सुधन** : त्या कवडी किमतीच्या माणसाला मारायला पंचवीस हजार कशाला? पंचवीस पुरतील.

**सुरेश** : आवं त्याला तुमच्याखातर मारायचाय नव्हं? तुमच्याकडे पाहूनशान आमी त्याची किंमत करणार?

**सुधन** : छे हो तुम्ही फारच मोठी किंमत सांगता.

**सुरेश** : आवं आम्ही तुम्हाला मोठं मानतो.

**सुधन** : पण त्याला मारून माझा फायदा काय?

**सुरेश** : आवं तुमची बायको, तुमचं पैसे...

**सुधन** : गेलं ते गेलं. भगवान म्हणतात, गतं न शोच्यम्! बायको पळून गेली तर अश्रू गाळू नयेत. शोक म्हणजे नुकसान. शोक काय, सूड काय – सगळा तोटाच. म्हणून फायद्याचा विचारच आता केला पाहिजे. बायको गेली म्हणून रडण्यापेक्षा दुप्पट उत्साहानं दुसरी केली पाहिजे. पहिलीनं आपल्या जाण्यानं निर्माण केलेली पोकळी सर्वार्थांनी भरून काढील अशी दुसरी अतिविशाल बायको केली की झालं. एक भाडेकरू गेला की जागेचं भाडं आणि पागडी वाढवता येते तसं एक बायको गेली की दुसरीचा हुंडा आणि करणी वाढवता येते!

**सुरेश** : छान! माजा येळ तुमी फुकट घालीवलात! यवढ्या येळात मी दहाबारा गिऱ्हाईकं मिळवली असती आणि वीसपंचवीस खून केले असते.

**सुधन** : (त्याच्या डोक्यावरची पांढरी टोपी आपल्या डोक्यावर घालीत) तुमचा रक्तरंजित मार्ग तोट्याचा आहे! आमचा अहिंसक मार्गच फायद्याचा आहे. हिंदुस्थानाला अहिंसामय क्रांतीच केली पाहिजे. महात्मा गांधींनी देशात क्रांती केली. मी समाजात क्रांती करतो. बायको पळाली किंवा पळवून नेली तर शोक करू नका वा सूडाचं चक्र फिरवू नका. अधिक हुंडा घेऊन दुसरी बायको करा! ती गेली तर त्याहून जास्त हुंडा घेऊन तिसरी बायको करा. ती गेली तर त्याहून जास्त हुंडा घेऊन...

**सुरेश** : आपण साक्षात भगवान श्रीकृष्ण होणार : सोळा हजार एकशे आठ वेळा..

**सुधन** : म्हणून तर सोन्याची द्वारका!

**सुरेश** : साष्टांग नमस्कार, भगवान! गुरू आहांत!

**सुधन** : मग आधी गुरुदक्षिणा द्या! द्या ना! मग... (सुरेश पळून जातो.) मेलो! ठार बुडलो! (जरा वेळाने) आम्ही एवढी खटपट करतो, एवढी लटपट करतो, आणि दिवसेदिवस अधिकाधिक श्रीमंत होतो, पण आमचं कौतुक कोणी करीत नाही; आणि बायका काही कमावीत नाहीत उलट दिवसेदिवस जास्तीत जास्त खर्च करतात, पण सगळे कवी कायम बायकांवरच काव्यं करीत असतात! आणि सगळं जगसुद्धा त्या कवींचंच कौतुक करतं! पण कसलं ते काव्य! ते कवी बायकांचं

हरण करतात–मृगनयना! जनावरं करतात–गजगती! रानटी जनावरं करतात–सिंहकटी! पण कवी अशी बायकांना नावं ठेवतात, त्यांच्यावर खोटे, कागदी अलंकार घालतात, तरी जग त्यांचंच कौतुक करतं! मग कवी जर कायम बायकांचाच काव्यव्यापारात उपयोग करतात तर आम्ही श्रीमंतांनी आमच्या उद्योगव्यापारात बायकांचाच वापर केला म्हणून काय बिघडलं? कवी बायकांची नुसती शब्दचित्रं काढतात. आम्ही भांडवलदार बायकांची भडक चित्रं काढतो. कवी बायकांच्या नावानं आपण रडतात, आणि जगाला रडवतात! आम्ही उद्योगपती बायकांना हसवतो आणि त्यांचे हसरे चेहरे छापून सगळ्या जगाला हसवतो! आम्हीच स्त्रियांचं सौंदर्य खुलवतो. सगळा बाजार आम्ही स्त्रीमय करून टाकला आहे! मग स्त्रियांचे खरे कैवारी आम्हीच नाही काय? हा बीनाचा फोटो! घरात पडून काय उपयोग? देऊन टाकतो साबणाच्या कंपनीला! तेवढेच पैसे वसूल!

(सुरेश एका श्रीमंत वधूपित्याच्या भूमिकेत एका पडदानशीन मुलीला घेऊन येतो.)

**सुरेश** : हं हं हं हं – नमस्कार सुधनराव! नमस्कार! मी प्रेम मूर्ती! पूर्वीचा दक्षिणी आहे. पण लग्नापूर्वी भरपूर वरदक्षिणा देतो. दहा बहिणींची लग्नं त्यांच्या नवऱ्यांनी मागितलेली वरदक्षिणा देऊन केली. आपल्याला यंदा कर्तव्य आहे असं कळलं?

**सुधन** : कसं?

**सुरेश** : जगजाहीर झालंय ते! वधूपित्यांची तारांबळ उडाली आहे आपल्याकडे येण्यासाठी. त्यांच्यापुढे पळण्यात मी पहिला नंबर मिळवला. वरदक्षिणा पण पहिल्या नंबरची देईन. कॉंपिटिटिव्ह रेटस्! आपण मागा!

**सुधन** : अहो पण हे सगळं तुम्हाला प्रत्यक्ष कुणी सांगितलं? कोणत्या दलालानं...

**सुरेश** : आपल्याच पहिल्या कुटुंबानं...

**सुधन** : काय तिनं स्वतःच सांगितलं आणि तुम्हाला माझ्याकडे पाठवलं?

**सुरेश** : तोंडानं नव्हे, करणीनं!

**सुधन** : चांगली बायको होती. जाता जाता एक तरी सत्कृत्य केलं म्हणायचं तिनं! पण आमच्या अटी मान्य असतील तरच आम्हांला यंदा कर्तव्य आहे!

**सुरेश** : सगळ्या अटी मान्य!

**सुधन** : आमच्या पहिल्या बायकोनं आमचा हुंडा बुडवला हो!

**सुरेश** : त्याच्या दुप्पट आम्ही देऊं. द्यायचा ना ग? (ती नंदीबैलाप्रमाणे मान हलविते.)

**सुधन** : तिनं चांगली हातातली नोकरी सोडून दिली हो!

**सुरेश** : आमची मुलगी दिवसा एका बॉसकडे फुलटाइम कामाला आहेच. पण आपण म्हणाल तर दुसऱ्या कुणाकडेही फुलटाइम रात्रपाळीला चिकटवून देऊ? आमच्या पुष्कळ ओळखी आहेत. काय ग, करशील ना रात्रपाळी? (ती नंदीप्रमाणे मान हलवते.)

**सुधन** : छान! छान! आदर्श बायको आहे. दिवसपाळी आणि रात्रपाळी दोन्हीही करू देत. मी तिच्यावर दुप्पट प्रेम करीन.

**सुरेश** : आणखी काही अट?

**सुधन** : हो. मुलीला भाऊ किती?

**सुरेश** : बारा! बारा भाऊ आहेत आणि बहीण एकही नाही! म्हणजे ही बहीण आहे! भाऊ सगळे श्रीमंत आणि दानशूर आहेत. भाऊबीजेला सर्व भाऊ बहिणीला सोन्यानं मढवितात.

**सुधन** : वाः वाः वाः! अशी बायको पाहिजे! नाही तर आमची पहिली बायको! बरं झालं पळवली गेली!

**सुरेश** : पण मुलगी जरा वर्णानं–

**सुधन** : सुवर्ण आहे ना?

**सुरेश** : पहा ना हे दागिने : अस्सल शंभर नंबरी आहेत. कसोटी घेऊन पाहा. गॅरंटीड माल! पण मुलगी जरा बुकिश ज्ञानात...

**सुधन** : तिच्या बँकबुकांत भरपूर अर्थ आहे ना?

**सुरेश** : हो हो. शंकाच नको. दाखवतो. – पण मुलगी जरा वयानं–

**सुधन** : तिला वारशानं भरपूर मालमत्ता आहे ना?

**सुरेश** : अहो मुलगी म्हणजे प्रत्यक्ष मालमत्ताच! अतिविशाल प्रॉपर्टी आहे! काय ग?

**सुधन** : मग ठरलंच तर!

**सुरेश** : आणखी काही?

**सुधन** : बाकी गोष्टी आहेत, पण त्या गौण आहेत. एवढे गुण जुळल्यावर पत्रिका जुळणारच! लग्न ठरलं! लग्न लागलं! लग्न झालं!

**सुरेश** : अहो पण मुलगी पाहून घ्या. काय ग?

**सुधन** : हं हं त्यात काय? त्यात काय? आधी याद्या होऊ द्यात.

**सुरेश** : याद्या आपण करा. आम्ही सह्या करू. आमची एकुलती एक लेक. तिला पदरात घ्या. म्हणजे आम्ही मोकळे झालो! हं हं. समजलं. आमच्यासमोर तुम्हाला लाज वाटणार. आम्ही जरा बाहेर जातो. तुम्ही तरुण मंडळी. तुम्हीच जरा हलक्या हातानं घुंघट के पट खोल! बुरखा दूर करून पाहा. प्रथमदर्शनी प्रेम! हँ हँ हँ!!

(जातो. सुधन बुरखा दूर करतो. आत एक मिशाळ दाढीवाला!)

## प्रवेश दुसरा

### बीनाचे घर

(बीना आणि सुरेश बाहेरून येतात.)

**बीना** : सुरेश, सुरेश... (स्फुंदत स्फुंदत रडते.)

**सुरेश** : थांब. म्हणजे 'रडायचं थांब' असं नव्हे. बोलायचं थांब! रडणं एकदाचं होऊन जाऊ दे. विनाकारण का असे ना. पण दोन्ही एकदम जमायचं नाही.

**बीना** : (रागाने) सुरेश–

**सुरेश** : एक काहीतरी कर. बोलणं, नाही तर रडणं.

**बीना** : तुला माळी माझ्या भावनांची कदरच नाही.

**सुरेश** : अग चांगली कदर आहे म्हणूनच सांगतोय. दुहेरी त्रास घेऊ नकोस. आधी रड, मग बोल, किंवा आधी बोल, मग रड.

**बीना** : सुरेश...

**सुरेश** : आधी बोललीस तर बरं. म्हणजे मला कारण कळेल आणि तुझं रडून होईपर्यंत मी काहीतरी दुसरं काम करीन.

**बीना** : सुरेश, सुरेश, सुरेश, कसं सांगू तुला?

**सुरेश** : न रडता.

**बीना** : पण मला किती वाईट वाटतंय तेच सांगायचंय मला!

**सुरेश** : तेसुद्धा हसून सांगितलंस तरी चालेल! कारण ज्याबद्दल वाईट वाटायचं ते संपलेलं आहे.

**बीना** : पण सुरेश, ते वाईट आपल्यामध्ये येण्यापूर्वीच मी तुझी झाली असते, तर?

**सुरेश** : तर फार फार वाईट झालं असतं!

**बीना** : काऽऽय?

**सुरेश** : म्हणजे ब्रह्मपुत्रेसारखी तू जी हिंदुस्थानाची वाट सोडून, चुकून, लांबून, आडवळणानं तिबेटमध्ये जाऊन परत हिंदुस्थानात आलीस ती जर सरळ आली असतीस तर बरं झालं नसतं!

**बीना** : माझं सरळ वागणं बरं झालं नसतं? मी चुकले म्हणतोस आणि तेच चांगलं झालं म्हणतोस? तू म्हणतोस तरी काय?

**सुरेश** : वाट चुकलेलं माझं कोकरू परत घरी आलं म्हणून मला फार बरं वाटलं.

**बीना** : खरंच?

**सुरेश** : तसं पूर्वी वाटलं असतं का?

**बीना** : तसं कसं वाटेल?

**सुरेश** : आणि आता हे माझं कोकरू पुनः कध्धी नाही वाट चुकायचं! चुकेल?

**बीना** : अं हं! चुकूनसुद्धा नाही.

**सुरेश** : तू जर पहिल्याप्रथमच माझी बायको झाली असतीस ना, म्हणजे मी जर तुझा पहिलाच नवरा झालो असतो ना, तर तू अशा तोऱ्यात वागली असतीस, अशा तोऱ्यात वागली असतील...

**बीना** : म्हणजे, मी तोऱ्यात वागू नये?

**सुरेश** : की नवरा माझ्या पर्सात ग!

**बीना** : हो हो, तू अगदी गरीबच की नाही?

**सुरेश** : आता तुला नवऱ्याची, नव्हे, माझी किंमत कळेल! कारण तुला माणसं कशी असतात ते चांगलं कळलंय! आणि चांगलं माणूस कसं असतं हेही कळलंय! कळलंय ना? की जायचंय पुनः त्या नवऱ्याच्या वाटेला... रांधा, वाढा, उष्टी काढा आणि हुंडा, पगार, भाऊबीज द्या!

**बीना** : मला कलासाधना करायची होती रे! म्हणून मी...

**सुरेश** : श्रीमंत नवऱ्याची आराधना केली!

**बीना** : तू आता या गरिबीत काय करणार आहेस रे?

**सुरेश** : जे आतापर्यंत केलं तेच! तुझ्या भोवतीभोवती फिरणार आहे!

**बीना** : त्यानं पोट भरणार आहे?

**सुरेश** : अग, गरिबीतसुद्धा प्रेम असलं म्हणजे पोटभर आनंद मिळू शकतो. आहे ना तुझं प्रेम माझ्यावर? मग होईल तुला पोटभर आनंद!

**बीना** : तू तुझ्या मुलाचं नाव आनंद ठेवणार आहेस?

**सुरेश** : होईल! होईल! तुला पोटभर आनंद होईल! तू मनात आणशील तितक्या वेळा होईल!

**बीना** : मी मनात आणीन तितक्या वेळा? पण तुझ्या मनात किती वेळा आहेत? अगदी कल्पवृक्षाखाली बसल्यासारखंच बोलतो आहेस?

**सुरेश** : अग प्रेम म्हणजे कल्पवृक्षच!

**बीना** : अरे पण आधीच गरिबी. त्यात पोरांचा गुणाकार म्हणजे पैशांचा भागाकार! आणि मग ज्या कलेनं आपण एकत्र आलो त्या कलेला

काय रामराम?

**सुरेश** : अग चंद्राच्या कला कशा रोजरोज नव्यानव्या असतात की नाही? तशा वाढत्या मुलांच्यासुद्धा रोजरोज नवीन नवीन कला दिसतात! आपली कळा होईल पण आपल्या मुलांच्या कला वाढतील.

**बीना** : पण माझी कला, माझं संगीत, माझा अभिनय...

**सुरेश** : माझी कला, माझं संगीत, माझा अभिनय...

**बीना** : कसे फुलतील? कसे वाढतील?

**सुरेश** : वाढतील. खूप वाढतील. फक्त हीच नावं मुलांना ठेवू म्हणजे झालं!

**बीना** : असंच समाधान मानायचं?

**सुरेश** : अग सगळं जगसुद्धा मानण्यावरच आहे!

(इतक्यात 'पोस्टमन' अशी हाक ऐकू येते, आणि एक मोठा लखोटा त्यांच्या डोक्यांवर येऊन पडतो.)

**सुरेश** : तुझंच पत्र. वाच.

**बीना** : तुझंच आहे. वाच.

**सुरेश** : ऊंहूं. तू.

**बीना** : ऊंहूं. तू.

**सुरेश** : बरं, सहवाचन करू. हं काय? 'तुमची कोर्टात अडकून पडलेली सर्व इस्टेट म्हणजे लाख रुपयांची स्थावर मालमत्ता आणि लाख रुपयांची जंगम मालमत्ता कोर्टाच्या हुकुमानुसार निर्वेधपणे तुम्हाला मिळालेली आहे!'

**बीना** : अय्या! सुरेश! अगदी मुहूर्तावर निकाल लागला, नाही? आता-

**सुरेश** : आता दुसरं तिसरं काही नाही! आता फक्त कलाविलास!

**बीना** : फक्त 'कला' विलास?

**सुरेश** : मग आणखी काय?

(तो प्रश्नमुद्रा करून, ती कंबरेवर हात ठेवून - झांशीची राणी, एकमेकांकडे जात असताना...)

# मुरलीधर जावडेकर साहित्यकला प्रतिष्ठान

**अ काव्य**

१. नव्या युगाच्या कविता

२. 'नवरा नको ग बाई' आणि इतर पथनाट्ये

**ष्ट कथा**

३. 'नको हे पुरुषी मन' आणि इतर लघुकथा

४. शुभ मंगल! विज्ञान!! (विज्ञान कथा)

५. 'अवतार' आणि इतर कथा

**पै नाटक**

६. मस्तानीचा बाजीराव

७. सत्तेचा विजय असो!

८. प्रीती मिळेल का हो?

९. गजराज आणि वनराज

१०. आग लागो या सगळ्याला

११. चल ये, चल ये, चल ये, बयेऽ

१२. 'निम्मी माझी, निम्मी तुझी' आणि इतर एकांकिका

**लू पटकथा**

१३. स्वातंत्र्यवीर

**सा कादंबरी**

१४. त्सुनामीची सुवर्णसंधी

१५ किलर इन्स्टिंक्ट

१६. अंतिम सत्य

**हि विज्ञान**

१७. विज्ञानाचा कल्पतरू

**त्यि समीक्षा**

१८. साहित्यातील प्रीती आणि भक्ती

१९. महाराष्ट्रातील वैज्ञानिक क्रांती

२०. केशवसुतःवैदिक संस्कृतीचा आधुनिक उद्गाता

२१. केशवसुत गातचि बसले!

२२. वैज्ञानिक समीक्षा

**क संकीर्ण**

२३. हिंदू समाजाचा छेदाभ्यास

२४. इंग्रजीत नापास? अशक्य!!!

२५. To Be, or Not To Be

# प्रतिभेचा स्तिमित करणारा साक्षात्कार

## मुरलीधर जावडेकर यांची कला

**कथाकथन** : १५ ऑगस्ट १९९९ रोजी स्वातंत्र्यदिनानिमित्त अमेरिकेत कथासंग्रहप्रकाशन आणि कथाकथन केले. महाराष्ट्रात अनेक प्रयोग केले. श्रोते चकित, आनंदित, प्रभावित होतात. कितीही वर्षे जावोत पुनः भेटले की कथांची आठवण काढतात. आजचे आघाडीचे कथाकार.

**नाट्यवाचन** : 'मस्तानीचा बाजीराव' या स्वतःच्या नाटकाचे वाचन थोरल्या बाजीरावांच्या तीनशेव्या जन्मदिनी पुण्यात केले. त्यानंतर दूरदर्शन (सह्याद्री) ने मुलाखत घेतली आणि नाट्यवाचनाचे वर्णन 'मंत्रमुग्ध करणारे' असे करून ती प्रसृत केली. डॉ. वि. भा. देशपांडे आदींना आवडलेली संहिता आणि नाट्यवाचन.

**काव्यप्रस्तुती** : साहित्य संमेलनाध्यक्ष कविवर्य श्री. नारायण सुर्वे, गंगाधर महांबरे, संगीता जोशी इत्यादींना आवडलेल्या कविता. काव्यसंग्रहप्रकाशन आणि 'काव्याचे नाट्यपूर्ण बहारदार सादरीकरण' केले.

**एकपात्री नाट्यप्रयोग** : 'स्वातंत्र्यवीर' (वि. दा. सावरकर) हा (सावरकरांच्या ६ ध्वनिमुद्रित पदांसह) प्रयोग अत्यंत प्रभावी होतो. स्वर्गीय सुधीर फडके, शिवशाहीर बाबासाहेब पुरंदरे, स्वा. सावरकर संमेलनाध्यक्ष वा. ना. उत्पात आदींनी दाद दिली. प्रेक्षकांना सावरकर भेटल्याचा परमानंद होतो. पुण्याच्या 'सांस्कृतिक वार्तापत्र' संस्थेने याबद्दल सत्कार केला.

**व्याख्यान, मुलाखत इत्यादी** : धर्म, विज्ञान, संस्कृती, वाङ्मय इत्यादी विषयांवर महाराष्ट्रातच नव्हे तर अन्य प्रांतांतही अनेक व्याख्याने झाली. दूरदर्शन आणि आकाशवाणी यांनी अनेक मुलाखती घेऊन पुनः पुनः प्रसारित केल्या.

**डॉ. मुरलीधर जावडेकर**

**जन्म** : २० मे, १९३६, शिक्षण : एम.ए. (पुणे), पीएच.डी. (मुंबई)
**व्यवसाय** : मराठी, इंग्रजी प्राध्यापक, प्राचार्य.
म्हाडा उच्च उत्पन्न गट वसाहत, इमारत क्र. १,
गाळा क्र. ९, संत तुकाराम नगर, पिंपरी, पुणे ४११ ०१८
(महाराष्ट्र राज्य-भारत)
**दूरध्वनी** : ०२०-२७४२१६८३
**मोबाईल** : ९८९०१६९१५६

पुस्तक कसं वाटलं? मराठी भाषेला स्वतःची अंगभूत गोडी आहेच. त्यात डॉ जावडेकरांचं शैलीदार लिखाण. मजा आली ना? मराठी पुस्तक वाचताना नेहमीच मजा येते. मराठी आहेच तशी.

पण काय ही आज मराठीची दूरवस्था! आज महाराष्ट्रात दोन मराठी माणसेसुद्धा एकमेकांशी मराठीत बोलत नाहीत. महाराष्ट्रात दुकानांवर मराठी बोर्ड असावेत म्हणून “खळळ खट्टाक” करावे लागते. मराठी कवी लेखकांची मुलं इंग्रजी माध्यमात शिकतात. मराठी शाळा ओस आणि बंद पडत आहेत. पुस्तकांचं वाचन करायच्या वयात मुलं पाण्यासाठी वणवण करताहेत.

अशा वेळी मराठीचा डंका महाराष्ट्रात नव्हे, भारतात नव्हे तर जगभरात गजबजेल अशी स्वप्नं आम्ही पहातो. आमच्यासारखे अनेक लोक पहातात. २३०० वर्षांचा इतिहास असलेल्या या अमृतवाणी मराठी साहित्याचं सुवर्णयुग येईल अशी खात्री आम्ही बाळगतो. कारण मराठीत समृद्ध साहित्य आहे. कारण मराठी माणसांकडे बुद्धीमत्ता आहे. कारण मराठी माणसांकडे प्रतिभा आहे. कारण मराठी नवीन साहित्यिक आणि नवीन वाचकवर्ग उभा होताना आम्ही पहातो आहोत. बारा कोटी मराठी माणसांच्या या भाषेला अमरत्त्व आहेच आहे याची आम्हाला शंभर टक्के खात्री आहे. म्हणून आम्ही  बारा लाख मराठी लेखक वाचकांचं नेटवर्क उभं करण्यासाठी आम्ही झटत असतो. दर आठवड्याला नवनवीन ई पुस्तकं दोन लाख लोकांना विनामूल्य पाठवत असतो.

हा यज्ञ दिवसेंदिवस मोठे रूप घेतो आहे. आणि त्यात हजारो हातांचं योगदान येत आहे. नवीन लेखक पुढे येत आहेत. हजारो लोक, रोज, कुणी आठ, कुणी दहा, कुणी शंभर, मेल आय डींचं योगदान देत आहेत. तुम्हीही तुमच्या ओळखीच्या शक्य तेवढ्या मराठी लोकांचे ई मेल आय डी आम्हाला पाठवा. त्यांना दर आठवड्याला विनामूल्य ई पुस्तकं पाठवली जातील. मराठी माणूस भले पैशात मागे असेल, पण वाचनात इतर लोकांपेक्षा नक्की पुढे आहे. आणि आज ना उद्या ही गोगल गाय वाटणारी भाषा ढाण्या वाघाचं स्वरूप धारण करील. करीलच!

सर्वांची साथ हवी यार! कृपया आपल्या किमान आठ आप्त मित्रांच्या मेल आय डी esahity@gmail.com  या पत्त्यावर कळवा आणि या महायज्ञात सामिल करा. त्यांना आम्ही नवनवीन मराठी पुस्तकं विनामूल्य
पाठवू.

ई साहित्य प्रतिष्ठान



**डॉ. मुरलीधर जावडेकर**

नाट्यसंमेलनाध्यक्ष पद्मश्री **प्रा. अनंत काणेकर**

''नाटक मजेदार वाटले. लेखनाला धार आहे.''

श्रेष्ठ साहित्यिक आणि समीक्षक **प्रा. म.ना. अदवंत**

''आपले नाटक मला फार आवडले. विनोदी नाटकाचा हे नाटक म्हणजे सुंदर नमुना आहे. कवडीचुंबकावर आजपर्यंत अनेक नाटककारांनी लिहिले आहे पण तुमच्या नाटकातील कवडीचुंबक 'सुधन' हा एक वेगळाच नमुना आहे. कलेचे वेड असणारी बीनापण एक वेगळाच विनोदी नमुना आहे. या दोन पात्रांना सुरेशची मिळालेली जोड विनोदाला पूरकच ठरली आहे. प्रसंगनिष्ठ विनोद व शब्दनिष्ठ विनोद यांचाही आपण भरपूर वापर केल्यामुळे नाटक शेवटपर्यंत हसवत ठेवते... अवघ्या तीन पात्रांवर नाटक शेवटपर्यंत रंगवत ठेवले आहे. हा तुम्ही केलेला विक्रम मराठी नाट्यसृष्टीत अपूर्वच म्हणावा लागेल!''

जगन्मान्य लेखक आणि नाट्यस्पर्धापरीक्षक **श्री.श्री.ज. जोशी**

''नाटक खूपच आवडले. विशेषतः तुम्ही संवाद फार छान लिहिले आहेत.''

ज्येष्ठ प्राध्यापक आणि नाट्य अभ्यासक **श्री.वि.अ. कुलकर्णी**

''आपल्या ठिकाणी उज्ज्वल नाट्यप्रतिभा असल्यामुळे अभिनवरम्य नाटक लिहिण्यात आपण प्रशंसनीय सुयश संपादन केले आहे. या नाटकातील कथानक, संवाद, विनोद व समाजदर्शन हे सारे आकर्षक व आल्हादक वाटते.''